## ' इंद्रायणी 'च्या तीरावर

माझ्या श्रद्धेच्या इंद्रायणीकांठीं नांदणारे हे कांहीं देव आहेत. यांत कालिदास आणि जिब्रान हे दोन महाकवि आहेत, तर बाकीचे आठ महान् संत आहेत. या दहा व्यक्तींविषयींचें हे लेख मीं १९५६ ते १९५९ या काळांत ' साधना ' साप्ताहिकाचे संपादक आणि माझे मित्र श्री. यदुनाथ थत्ते यांच्या स्नेहाग्रहामुळें लिहिले. हे सर्व लेख गुणसंकीर्तनात्मक आहेत. त्यांत बुध्दिपक्षाहून भावपक्षाचेंच प्राबल्य अधिक आहे. आणि म्हणूनच या लेखांना मीं ' गौरव - लेख ' असें पर्यायनाम दिलें आहे. माझे ज्येष्ठ मित्र श्री. द. र. कोपर्डेकर माझ्याविषयींच्या उत्कट आस्थेनें हे लेख पुस्तकरूपानें प्रसिध्द करींत आहेत. त्यांना आभाराचे उपचार रुचणार नाहींत. माझ्या अन्य पुस्तकांप्रमाणेंच याहि पुस्तकाचें मराठी वाचक स्वागत करतील, असा विश्वास वाटतो.

' लोककल्याण '
७७ शनिवार, पुणें २

रामचंद्र चिंतामण ढेरे

# इं द्रा य णी

संत आणि साहित्यक यांचा
गौरव गाणारे नऊ लेख

# कालिदास

कालिदासाच्या हृदयांत विराग आणि अनुराग उमामहेशाप्रमाणें एकजीव होऊन नांदत होते. जीवनाच्या धुंद विलासांतहि शाश्वत सत्यावरील दृष्टि त्यानें ढळूं दिली नाहीं. किंबहुना विरक्ति आणि अनुरक्ति यांचा समन्वय साधून त्यानें 'जीवनयोग' आचरिला. सायं-काळच्या वेळी उज्जयिनीतील प्रासादांच्या गच्चीवरून येणाऱ्या पुरवधूंच्या कचगंधानें बेभान होणारा, उत्तररात्रीं विकारवश अभिसारिकांचे पथ न्याहाळणारा, पुष्पासवाच्या धुंदींत संगीताचे आलाप घुमविणारा आणि यौवनाच्या किमयेचें बहुविध दर्शन घडविणारा कालिदास—त्याच्या अन्त-र्मनांत सदैव एक पवित्र तपोवन होतें. त्या तपोवनांत प्रेय आणि श्रेय यांची अविभक्त साधना चालू होती. तिथें विकार विचारांत परिणत होत होते. काम जीवनाचें साम-गायन गात होता; वासना सृजनाची अर्चना बनली होती.

मला वाटतें, 'शाकुन्तल' आणि 'कुमारसम्भव' हीं कालि-दासाच्या 'जीवन-योगा'चीं प्रतीकें आहेत. त्यांत जीवनांतील प्रमत्त वसन्त, उत्तप्त ग्रीष्म, आर्द्र वर्षा आणि प्रसन्न शरद् आहे. कालिदासाचा वसन्त ग्रीष्मांत होरपळून नष्ट होत नाहीं—भाजलेल्या उरांत शरदाचीं मंगल स्वप्नें खेळवीत तो वर्षेला आवाहन करीत आहे.

त्याच्या उमेला महेशाचा ध्यास आहे. अशोक-कर्णिकारांचे अलंकार लेवून, बालारुणासारखें वस्त्र परिधान करून, बकुलमालेची मेखला चढवून शिवाच्या पूजेसाठीं आलेली उमा हातांतील लीलाकमलांनी खोडकर भ्रमरांना दूर उडवीत आहे. फुलांनीं डंवरलेल्या पल्लविनी लतेसारखें तिचें रूप— पण तिचें अन्तरंग भस्मभूषित शिवरूपानें रंगलें आहे— तिच्या तना-मनानें त्या मृत्युंजयाची पूजा बांधली आहे. पण कालिदासानें या विकारी अनुरागाला शिव-पूजनाचें समाधान दिलें नाहीं. ग्रीष्मांतील धरतीप्रमाणें जेव्हां उमेनें दारुण तप केलें, तेव्हां स्नेहार्द्र वरुणाप्रमाणें शिवानेंच आपण-हून उमेचें पाणिग्रहण केलें. 'देवां'च्या विजयासाठीं आवश्यक असणाऱ्या 'कुमार-सम्भवा'ची, शुभंकर पौरुषाच्या उदयाची ही पार्श्वभूमि !

० ० ०

कालिदासाला रंगेल मानणाऱ्यांना कालिदास समजलाच नाहीं. कालिदासाच्या वाङ्मयविश्वांत केवळ नायिकांचें चित्रणच मनोवेधक आहे, हा समजहि अज्ञानजन्य आहे. त्याचा रघुवंश तर केवळ आदर्शानुगामी पौरुषाचें चित्रण करण्यासाठींच तयार झाला आहे. त्याचें पौरुष तपाचा आदर करणारें आहे— निग्रह आणि अनुग्रह या दोहों गुणांनीं युक्त आहे. तें तपोवनांत 'विनीतवेशा'नें प्रवेशतें आणि 'आर्तत्राणा'साठींच शस्त्र उगारतें. 'अनुत्सेकः खलु विक्रमालंकारः ।' ही त्याची वृत्ति. जीर्ण-जडाचा प्रलय करणारें ताण्डव आणि नवसृजनाच्या महोत्सवांत रंगणारें लास्य— या उभयविध रूपांत कालिदासाचें मन प्रकटलें आहे. त्याच्या कामार्थांची गंगा धर्माच्या तीरांनीं बद्ध होऊन मुक्तीच्या महासागराकडे धांव घेत आहे आणि तिला संगमाहूनहि वहनाचें वेड अधिक आहे.

० ० ०

मला त्याच्या मातापित्यांचीं नांवें आठवत नाहींत; त्याच्या गुरूचेंहि नांव आठवत नाहीं. मालिनीच्या तीरावरील एका तपोधनाच्या आश्रमांत

त्याला मीं प्रथम पाहिलें. दोन सहस्रकें लोटलीं असतील, पण अजूनहि माझी स्मृति धूसर झाली नाहीं. नदीचा रम्य परिसर, घनदाट आम्रराजि, बहरलेल्या मोगऱ्याच्या वेली, कुटिरांपुढें नीवार वाढलेलें, हरिणें बागडताहेत, मोर नाचताहेत आणि साऱ्या तपोवनांत पावित्र्य नि प्रसन्नता दाटली आहे. . . .

कालिदास इथेंच वाढला, इथेंच शिकला. स्वयंप्रज्ञा, रसिकता, विनय आणि श्रमशीलता यांचें पाथेय घेऊन तो आला आणि गुरुदेवांच्या चरणांपाशीं बसून त्यानें 'जीवनयोग' प्राप्त केला. त्यानें वेदांचें अध्ययन केलें; पण वेदांतील कर्मकाण्डापेक्षां उपनिषदांतील विराट् जिज्ञासेनेंच त्याला भारून टाकलें. षड्दर्शनांचा आणि व्याकरणादि वेदांगांचाहि त्यानें अभ्यास केला; पण चिन्तन आणि अनुभूति यांचें सातत्य त्यानें सोडलें नाहीं. नाट्यशास्त्र आणि साहित्यशास्त्रहि त्यानें आत्मसात् केलें; पण व्यापक अनुभूति, सर्वंकष रसिकता आणि भासादींची मौलिक प्रतिभा यांचीच त्यानें कास धरली. अर्थशास्त्र, धनुर्वेद आणि राजनीतीहि त्यानें पचविली; पण विशाल कल्याणभावनेंतून नि कर्तव्याच्या जाणिवेंतून निर्माण होणारी प्रजानुरंजकता हाच त्यानें राजनीतीचा अंतिम निकष मानला. ज्योतिःशास्त्रांतहि तो पारंगत झाला; पण आकाशांतील अजर-अमर काव्याचा आस्वाद तो आसुसलेल्या दृष्टीनें घेतच राहिला.

तपोवनांत गौतमीसारखी वत्सल तपस्विनी, प्रियंवदा नि अनसूया यांसारख्या अल्लड ऋषिबाला, शार्ङ्गरव नि शारद्वत यांसारखे सच्छील ऋषिकुमार यांच्या पवित्र सहवासांत त्याचें आन्तरजीवन उजळलें. जीवनांतील शाश्वत आनन्दाची पहांट त्याच्या हृदयांत फांकूं लागली आणि प्रेयश्रेयाच्या विवेकांतून त्याचा 'सौंदर्यात्म जीवनयोग' सिद्ध झाला.

एके दिवशीं भारावलेल्या मनानें त्यानें त्या तपोवनाचा निरोप घेतला आणि जीवनाची अनन्त साधना आचरण्यासाठीं तो बाहेर पडला. त्याच्या प्रतिभेच्या सुगन्धानें राजसत्ता व राजवैभव यांना आकर्षून घेतलें

आणि लौकरच तो उज्जयिनीचा राजकवि झाला. साधनेला स्वास्थ्य लाभलें आणि राजकवि राजसभेच्या मर्यादा ओलांडून लौकरच ‘ कविकुलगुरु ’ बनला—राजकाजासाठीं आणि अन्तरांत सौंदर्यदर्शनाचा हेतु बाळगून तो हिमालयापासून दक्षिण सागरापर्यंत भटकला . . .

० ० ०

रामगिरीच्या माथ्यावर उभें राहून पर्याकुल दृष्टीनें आषाढघनांचें स्वागत करणारा तो महाकवि मला वारंवार आठवतो. वर्षेचें त्याला अत्यंत वेड. सृजनाचें गाणें गुणगुणत मनाच्या उंबरठ्यावर हळुवार पाऊल टाकणाऱ्या यौवनाप्रमाणेंच तो वर्षेच्या विलासांतहि बेहोश होत असे. पर्वतांच्या गुहांतून घुमणारीं घनगर्जितें, वेळूंच्या वनांत बासरी वाजविणारा वारा, अंधाराचें हृदयविदारण करणाऱ्या विजा, प्रथमवृष्टींतील धुंद सुवास आणि मातीतून डोकावणाऱ्या बीजांचीं हिरवी गीतें त्यानें पुन्हा पुन्हा अनुभवलीं आहेत. पावसाच्या पहिल्या सरींत न्हाऊन निघालेल्या जमिनींतून केळफुलांच्या लालसर कळ्या रूप धरूं लागल्या, कीं त्याला धरती विवाहहोमाच्या धुरानें डोळे लाल झालेल्या सलज्ज नववधूसारखी भासत असे.

० ० ०

आपल्या भारत-यात्रेंत त्यानें निसर्गश्रीचें सौंदर्य तनामनानें लुटलें. आकाशगंगेनें विभागलेल्या शरदांतील नक्षत्रखचित आकाशाप्रमाणें रामसेतूनें विभागलेला फेसाळणारा नीलधवल महासागर पाहून त्याचें मन हरखून जाई. जनस्थानांतील आंब्यांच्या नि जांभळांच्या राईत तो कितीतरी वेळ विसावे. गोदेच्या परिसरांत अकारण भटकतांना तो अन्यमनस्क होई आणि तेथील भूमीच्या अणुरेणूंतून त्याला रामाच्या भावविव्हल हृदयाचें दर्शन घडे. तो कधीं पर्वताच्या माथ्यावरील कुड्यांच्या फुलांचा सुगंध अनुभवून धुंद होई, तर कधीं गुहांत लपलेल्या भयभीत अंधाराकडे पाहून हंसे ....

जास्वन्दीच्या फुलासारखी सायंकाळ, गतधवेप्रमाणें उदास दिसणारी दिवसांची फिकट चन्द्रलेखा, छायांतून निथळणारें प्रियेच्या स्पर्शासारखें कोंवळें चान्दणें, शरदांतील घूसर अभ्रांतून डोकावणारें निळें आकाश, सायंकाळच्या वेळीं सुखस्वप्नांप्रमाणें भिरभिरत जाणारी बलाकमाला, शंकराच्या विकट हास्यासारखी कैलासाची गहनगूढ शुभ्रता, किन्नरांच्या रंगमंदिरांतील पडद्यांसारखे विविधरंगी विरळ मेघ, बिरहिणीप्रमाणें भासणारीं शिशिरांतील कमळें आणि अन्तर्मनांतील अशुभसूचनांप्रमाणें रात्रीं घरांवर घुमणारे पारवे—अशीं अनेक निसर्गदर्शनें कविमनांतील भाववृत्तींशी ( Moods ) समरसून अवतरलीं आहेत. चिरयौवना ऊर्वशीप्रमाणें ऋतुचक्रांतून रूपें बदलीत धावणाऱ्या निसर्गश्रीचा प्रत्येक आलोक, प्रत्येक पदविन्यास कालिदासानें शब्दांतून साकार केला आहे. त्याच्या निसर्गदर्शनाची सूक्ष्मता, बिविधता आणि सौंदर्यमयता विश्वसाहित्यांत अजोड आहे.

० ० ०

तो सौंदर्ययोगी होता; सौंदर्य हेंच त्याचें जीवन बनलें होतें. त्याला सर्व चराचर सृष्टि सौंदर्यानें भारलेली दिसे. त्याच्या दृष्टींत कधीं श्रावणाच्या कोंबळ्या उन्हांत पंख निथळीत बसलेल्या पांखराच्या डोळयांतील लाघव येई, तर कधीं गगनाला गवसणी घालणाऱ्या गरुडाच्या दृष्टींतलि गौरव येई ... आणि तो सदैव सौंदर्य टिपून घेई. निसर्ग आणि मानवी मन यांत त्याला संपूर्ण सुसंवाद दिसे. निसर्गांतील सौंदर्य मानवाच्या चित्रणाला केवळ पार्श्वभूमि म्हणून त्यानें कधीं वापरलें नाहीं—त्याचा निसर्ग सजीव आहे, भावनात्म आहे. त्याच्या काव्यांत निसर्ग भावप्रतिमांच्या रूपांतच अवतरतो. किंबहुना कालिदासाचा सौंदर्यलोलुप आत्मा निसर्गाच्या विराट आत्म्याला मिठी मारण्यासाठीं सदैव अधीर असे. निसर्गाशीं तो संवाद करी, निसर्गाला तो आपलीं सुखदुःखें निवेदन करी आणि निसर्गाच्या सहवासांत मी-पण विसरून जाई.

० ० ०

तो कुणाशींहि मिळून मिसळून वागे. कांहीं क्षणांच्या सहवासांतच इतरांना त्याच्या सौजन्याचा नि सौहार्दाचा प्रत्यय येई. मित्र हें जीवनांतील सुखदुःखांच्या व्यक्तीकरणाचें ठिकाण आहे, असें त्याचें स्वानुभवाचें मत होतें. ' न खलु प्रेम चलं सुहृज्जने ' असा मैत्रीच्या दृढतेचा सिद्धान्त त्यानें सांगितला आहे. गृहस्थधर्माला त्यानें सर्वोच्च स्थान दिलें आहे. गार्हस्थ्य ही विकासाची प्रयोगशाळा आहे, असें त्याचें मत होतें. लहान मुलांचें तर त्याला विलक्षण वेड. त्यांच्या निरागस हास्यानें आणि मनोज्ञ लीलांनीं त्याचें देह-भान हरपून जाई. त्यांना तो अंगाखांद्यावर खेळवी, गोष्टी सांगे, गाणीं म्हणून दाखवी आणि तऱ्हेतऱ्हेचीं खेळणींहि करून देई. तो संयमानें वागे; संयमानें बोले. संयम हा त्याच्या जीवनाचा आणि कलेचाहि प्राणभूत विशेष आहे. त्याच्या वाणीतील लाघव आणि आचरणांतील प्रसन्न मार्दव सर्वांना मोहून टाकीत असे. त्याची जीवनाविषयींची रसिकता अपार होती. त्याचें जीवन ही एक आनन्दयात्रा होती. त्याचमुळें उषेलाहि लाजविणारा उल्हास त्याच्या शब्दाशब्दातून ओसंडत असे.

० ० ०

कालिदास ' शैव ' होता. तो विश्वांतील ' रुद्रते 'चा अन् ' शिवते 'चा पुजारी होता. हालाहल पचवून चान्दणें बरसणाऱ्या ' चन्द्रमौलि ' शिवाचा तो अनन्यभक्त होता. कृष्णसर्पांनाहि निर्विष बनवून गळ्यांत वागवणारा; उत्तुंग कैलासाच्याहि माथ्यावर पाय रोवणारा आणि आल्हादिनी उमेला हृदयांत स्थान देणारा ' मृत्युंजय ' शिव त्याला मानवी जीवनाचें परमध्येय वाटे. ' वागर्थाप्रमाणें सम्पृक्त ' असणाऱ्या उमामहेशांना त्यानें अनेकवार भक्तिभरानें वन्दिलें आहे. किंबहुना साऱ्या विश्वांतच त्याला उमा-महेशाच्या एकात्म प्रीतीचा साक्षात्कार होई. गंगा-यमुनांच्या संगमांतहि ' क्वचिच्च कृष्णोरगभूषणेव भस्माङ्गरागा तनुरीश्वरस्य ' असें मंगल शिवदर्शन त्याला घडत असे.

कालिदासाच्या जीवनांत सरस्वती व लक्ष्मी यांनीं सवतीमत्सर केला नाहीं. त्याच्या जीवनांतील क्षणन् क्षण सुखानें ओथंबलेला होता. त्यानें मानवी मनाचें तळापासून आलोडन केलें; पण जीवनांतील वास्तव कटुतेचा स्पर्शहि त्याच्या दृष्टीला झाला नाहीं. तो विंध्याच्या परिसरांत अनेकदां भटकला, पण गिरिजनांच्या झोंपडींत कधीं जिज्ञासेनें शिरला नाहीं. फुला-सारख्या कोवळया हरणाच्या शरीरांत घुसणारा व्याधाचा तीक्ष्ण बाण पाहून त्याच्या हृदयांतील सारी सहानुभूति हिंसेचा निषेध करूं लागली; पण सामान्य माणसाच्या घरट्यांत शिरून त्यांच्या सुखदुःखांचा विचार त्यानें केला नाहीं. त्याचें मन सदैव अलका आणि अमरावती यांच्या दिव्य वातावरणांत वावरत असे. कदाचित् उज्जयिनीचा प्रभु प्रजानुरंजनांत तत्पर असेल, कदाचित् त्या सुवर्णयुगांत प्रत्येक जीव सुखशांतीनें नांदत असेल आणि पूर्णतेचीं स्वप्नें रंगवीत असेल. कदाचित् तीं रंगीबेरंगी स्वप्नेंच कवीच्या संजीवक स्पर्शानें साकार होऊन त्याच्या साहित्यांत एकवटलीं असतील.

• ० •

रूप, रस, गन्ध, नाद, स्पर्श या सर्व संवेदनांतून त्यानें सौन्दर्याचें पान केलें आणि साहित्य, संगीत, चित्र, नृत्य आणि शिल्प अशा अनेक ललित माध्यमांतून त्या सौंदर्यानुभवांची अभिव्यक्ति केली. त्याचें साहित्य आज आपल्या हातीं आहे; संगीत आणि नृत्य केवळ स्मृतिरूपानें उरलें आहे आणि चित्र-शिल्प कालाच्या कठोर करानें पुसून टाकलें आहे.

एकाच कुसुम-पात्रांतून प्रियेला मधु पाजणारा भ्रमर, स्पर्शसुखानें डोळे मिटून घेतलेल्या मृगीला शिंगानें खाजवणारा कृष्णसार, कमळ-परागांनीं सुगंधी झालेलें पाणी आपल्या सोंडेनें हत्तीला पाजणारी हत्तीण, अर्ध-वट चावलेला मृणाल चक्रवाकीला देणारा चक्रवाक—हीं प्रेमाचीं प्रतीकचित्रें तो आपल्या कुशल कुंचल्याच्या एका फटकाऱ्यानें चितारीत असे.

० ० ०

सूर्याच्या कोंवळ्या किरणांनीं कमळकळी हळूहळू उमलावी, तसें कुंचल्याच्या किमयेंतून क्रमाक्रमानें फुलत गेलेलें त्याचें तें अमर चित्र अदृष्टावस्थेंतहि मला वेड लावतें...मालिनीचा प्रसन्न प्रवाह वाहतो आहे, तीरावर हिरवें मार्दव बहरलें आहे, वाळूंत हंसमिथुन विसावलें आहे, जवळच हिमालयाचीं धवल शिखरें आहेत, तपोवनांत झाडांवर वल्कलें वाळत आहेत आणि एक कृष्णसार आपल्या शिंगानें हरिणीच्या डाव्या डोळ्याच्या कडा खाजवीत आहे... शिंगाचा थोडासा धक्का लागला तरी डोळा फुटेल, पण त्याच्या हृदयांतील सारें हलुवारपण त्या शिंगाच्या टोकावर उतरलें आहे... ही श्वास रोधून अनुभवायची पार्श्वभूमि चितारल्यावर कालिदासानें लता-सिंचनानें श्रान्त झालेल्या शकुन्तलेचें अमर चित्र चितारलें होतें.

शकुन्तलेचीं अनेक चित्रें त्यानें रेखाटली होतीं. तपोवनांतील प्रमत्तयौवना शकुन्तलेपासून तों—

वसने परिधूसरे वसाना
नियमक्षाममुखी धृतैकवेणिः ।

या तपस्विनी शकुन्तलेपर्यंत तिचीं अनेक चित्रदर्शनें त्यानें घडविलीं होतीं. उमा-महेश हा तर त्याचा आवडता चित्रविषय. रामजीवनांतील हर्षामर्षांचे अनेक प्रसंगहि त्याच्या तूलिकेनें सजीव केले होते. वनांतून वाटचाल करीत असतां तमालवृक्षाची सुगंधी पालवी खुडून, यवांकुराप्रमाणें खुलणाऱ्या सीतेच्या गालांना शोभा देणारा अलंकार राम तिच्या कानांत घालतो... मृगयेहून परत आल्यावर गोदेच्या कांठावरील वेळूच्या बनांत सीतेच्या अंकावर तो विसावतो... अशीं कितीतरी भावगर्भ चित्रें त्याच्या चित्रशाळेंत रसिकांना भुलावण घालीत असत.

उत्सङ्गे वा मलिनवसने
सौम्य, निक्षिप्य वीणाम्
मद्गोत्रांकं विरचितपदं

गेयमुद्गातुकामा ।
तन्त्रीमार्द्रां नयनसलिलैः
सारयित्वा कथञ्चित्
भूयो भूयः स्वयमपि कृतां
मूर्च्छनां विस्मरन्ती ॥

हें उत्तरमेघांतील यक्षिणीचें करुणरम्य शब्दचित्र त्यानें रंगांतहि साकार केलें होतें. त्या चित्रांतील विरहिणीच्या वेदनेची आसावरी रसिकांच्या हृदयाला विकल करीत असे.

० ० ०

स्वरांच्या आरोहावरोहांतून श्रोत्यांच्या हृदयांतील चित्कलांना जाग आणण्याची किमयाहि त्याला साधली होती. त्याला संगीत हें सौंदर्याभिव्यक्तीचें विशुद्ध माध्यम वाटे. रवींद्र म्हणतात : " The true poets, they who are seers, seek to express the universal beauty in terms of music. " कालिदासहि आपली वैश्विक सौंदर्यानुभूति संगीतांत व्यक्त करी. ' नृत्यं गीतं च वाद्यं च ' या त्रयीवर त्याचा पूर्णाधिकार होता. वीणेच्या झंकारांतून तो कधीं स्वरांचें श्रुतिसुखद विश्व उभारी, तर कधीं मृदंगाच्या गंभीर ध्वनींतून नृत्याच्या लय-तालाला सामर्थ्य प्राप्त करून देई. अनेकदां त्याच्या हातीं या विविध माध्यमांतील सीमारेषा पुसट होत आणि शब्द संगीतरूप बने, चित्र शब्दरूप बने आणि संगीत मनोमय भावचित्रांची मालिका उभी करी. आजहि आपल्याला याचा प्रत्यय येतो कीं, त्याच्या शब्दांना रूप आहे, रस आहे, गन्ध आहे आणि नादहि आहे. स्पर्श-संवेदनांचा प्रत्यय तर तो जागोजागीं आणून देतो. उज्जयिनीच्या एखाद्या भूमिगत प्रसादांत त्याचें रंगविश्व आजहि प्रकाशाची वाट पाहत असेल काय ? सिप्रेच्या तरंगांवर त्याचें कण्ठमाधुर्य आजहि प्रतिध्वनित होत असेल काय ? नूपुरांच्या रुणझुणीला साथ देणारा त्याचा मृदंगध्वनि अजूनहि कुठें

घुमत असेल काय ? एकान्तांत बसून त्यानें छेडलेल्या वीणेच्या तारांचा झंकार महाकालाच्या गाभाऱ्यांत अजूनहि ऐकूं येत असेल काय ?

० ० ०

कालिदास हें एक सौन्दर्यसाक्षात्काराचें प्रतीक आहे–तें एक मानवतेचें ' सुखस्वप्न ' आहे. ती एक कधीं न सरणारी गोडी आहे. ... ती एक कधीं न उतरणारी धुंदी आहे. जिथें दिक्कालाच्या सीमा असीम सौन्दर्यानुभूतींत विरून जातात, त्या अपार्थिव विश्वाचा सम्राट म्हणजे कालिदास ! त्याला स्थलकालाच्या मर्यादेंत बसविणाऱ्या संशोधकांना वांकुल्या दाखवीत तो अनन्ताच्या शिखरावर उभा आहे !

' साधना ', ७ जुलै १९५६

# चक्रधर

समाजमन ही एक अजब चीज आहे. जीर्ण रूढींचीं अन् संकेतांचीं कुंपणें ओलांडायची त्याला भीति वाटते. त्या कुंपणांच्या ठरीव मर्यादेंत खुरटणारें जीवन झुगारून देण्याची त्याची कुवत किंवा तयारीहि नसते. जणूं त्या मर्यादांपलीकडे पाऊल टाकल्यावर आपण असुरक्षित बनूं, अशी खुळी चिंता त्याला वाटते. आणि त्याचमुळें ज्याला प्रथम त्या कुंपणांच्या व्यर्थतेचें ज्ञान होतें, तीं कुंपणें नाहींशीं करण्याचा विचार जो प्रथम धैर्यानें बोलून दाखवितो आणि कठोरपणें तीं कुंपणें उखडायला सिद्ध होतो, तो समाजमनाला शत्रुवत् वाटतो. त्याच्या विद्रोही कार्यशक्तींतूनच नवजीवनाचा संभव असतो, याची समाजमनाला जाणीवच नसते. या जाणिवेच्या अभावामुळेंच, या विनाशक स्थितिप्रियतेमुळेंच, सामाजिक जडतेचें उन्मूलन करून समाजजीवन गतिमान् बनविणाऱ्या बंडखोर आत्म्यांना बलिदान करावें लागतें आणि आपल्या कार्याचा पुरस्कार म्हणून उपेक्षा, अवहेलना आणि घृणा हंसतमुखानें पत्करावी लागते. त्याच्या बलिदानानें समाजमनांतील अंधाराला विजेची जखम होते, नवी जाणीव निर्माण होते आणि मग असीम श्रद्धेच्या गाभाऱ्यांत त्या बंडखोराची पूजा बांधली जाते.

० ० ०

पण नेहमींच असें घडत नाहीं. एखादें बलिदान चिर उपेक्षेचा महाशाप बरोबर घेऊनच घडत असतें. महाराष्ट्राच्या इतिहासांत महात्मा चक्र-

धराचें बलिदानहि असेंच चिर उपेक्षित आहे. आमच्या समन्वयात्मक आणि समावेशक संस्कृतीनें गीतेचें उद्‍गायन करणाऱ्या 'गोपाळ'–कृष्णाला पूर्णावतार मानलें, वैदिक कर्मकांडाविरुद्ध बंड उभारणाऱ्या भगवान् बुद्धालाहि सामावून घेतलें, परंतु कृष्णाचा आदर्श मानणाऱ्या आणि बुद्धाची महात्मता आचरणाऱ्या चक्रधराला मात्र आम्हीं बहिष्कृत केलें. या उपेक्षेच्या जाणिवेनें मनाला अत्यंत वेदना होतात; या कृतघ्नतेकडे पाहून हृदय अपार व्यथेनें विव्हळ होतें. कां हा इतका अवमान? कशासाठीं हा एवढा पक्षपात? समाजानें ज्ञानेश्वरांना छळलें, पण त्यांच्या योगसामर्थ्याचें दर्शन होतांच 'महाविष्णूचा अवतार' म्हणून त्यांचें पूजन सुरू केलें; अंत्यजसम्पर्कामुळें समाजानें नाथांना वाळींत टाकलें, परंतु त्यांचें महानुभावत्व प्रकटतांच त्यांचा गौरव सुरू केला; समाजानें तुकोबाला अनधिकारी पाखण्डी म्हणून हिण-विलें, पण त्याची अभंगवाणी इन्द्रायणीच्या तरंगांवर नाचूं लागतांच त्याचें गुरुत्व मान्य केलें; पण चक्रधराची समाजाला आठवणहि नाहीं! ग्यानबा-तुकारामाचा उद्‌घोष महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत होत असतो, परंतु ज्ञानेश्वरांच्याहि पूर्वी महाराष्ट्राच्या धार्मिक अन् सामाजिक जीवनांत नवी चेतना निर्माण करूं पाहणाऱ्या या महापुरुषाचें मूल्य मात्र पंथीय वाता-वरणाच्या मर्यादेंतच अडकलें आहे. पंथीयेतर महाराष्ट्रीय जनता आज सातशें वर्षें या महापुरुषावर उपेक्षेचे अन् अवमानाचे सतत आघात करीत आहे.

० ० ०

आश्चर्य असें कीं, महाराष्ट्राच्या उद्धारासाठीं बद्धपरिकर झालेला हा महापुरुष महाराष्ट्रीय नसून गुजराथी होता. भडोचच्या विशालदेव नामक प्रधानाचा हा एकुलता एक मुलगा. शके १०७५ च्या सुमारास तो जन्मास आला. त्याचें मूळ नांव हरपाळदेव. अवधूताच्या आशीर्वादानें जन्मास आलेला हरपाळ राजविलासांत वाढत होता; तरीहि भवितव्यता नकळत अवधूत-वृत्तीचींच चित्रें चितारीत होती. राजघराण्याच्या वातावरणांत

मिळणारें सर्व शिक्षण हरपाळाला मिळालें. युद्धविद्येंत तर त्यानें विलक्षण नैपुण्य संपादन केलें. सिंघण यादवाची गुजराथमधील स्वारी परतवून लावतांना हरपाळानें आपल्या युद्धनैपुण्याची विशेष चमक दाखविली. आपल्या या सर्वगुणसंपन्न पुत्राचें लग्न वडिलांनीं कमळाइसा नामक लावण्यमयी युवतीशी लावलें. दांपत्य-सुखाच्या वेलीवर लौकरच पुत्रप्राप्तीचें फूलहि उमललें. पण हरपाळ मात्र सुखविलासांत राहूनहि कांहीसा अलिप्तच होता. राजोपभोग भोगतांनाहि त्याची भक्तिप्रवणता लुप्त झाली नाहीं. लहानपणींच त्यानें ' गोपाळमंत्रा 'ची दीक्षा घेतली होती. परंतु त्याच्या वर्तनांत एक वैगुण्य असें होतें कीं, त्याला द्यूत खेळण्याचें व्यसन होतें.

एके दिवशीं द्यूतांत जवळचें सर्व द्रव्य हरल्यावर तो घरीं आला आणि कमळाइसेकडे तिचे दागिने मागूं लागला. परंतु तिनें दागिने देण्यास नकार दिला आणि द्यूताच्या व्यसनाबद्दल त्याची निर्भर्त्सना केली. या घटनेचा हरपाळाच्या मनावर गंभीर परिणाम झाला. त्याचें मन अंतर्मुख बनूं लागलें आणि जीवनांतील परम श्रेयाचे विचार त्याच्या मनांत तरळूं लागले. त्याच्या अन्तर्निहित अवधूत-वृत्तीला जाग येऊं लागली आणि सर्व मोहपाश तोडून सत्य-संशोधनासाठीं मुशाफरी पत्करण्याचा संकल्प त्याच्या अन्तर्मनांत घुमूं लागला. पण तो संकल्प लौकर साकारणें सोपें नव्हतें. पित्याच्या छत्राचा, मातेच्या वात्सल्याचा, लावण्यमयीच्या सहवासाचा आणि कोंवळ्या बालकाच्या स्पर्शाचा मोह तोडून कायमचें घराबाहेर पडणें अत्यंत कठीण होतें. हरपाळ अनुकूल संधीची वाट पाहत होता. शेवटीं रामटेकच्या यात्रेला जाण्याच्या निमित्तानें घराबाहेर पडण्याचा त्यानें निश्चय केला.

रामटेकचा प्रदेश यादवांच्या सत्तेखालीं असल्यामुळें बरोबर संरक्षक घेऊन जाण्याचें वडिलांनीं सुचविलें. सर्वांच्या दृष्टीनें हरपाळ यात्रेपुरता बाहेर पडणार होता, पण हरपाळाचा मात्र पुन्हा कधींहि न परतण्याचा निश्चय होता. घराबाहेर पाऊल टाकतांना त्यानें मातापित्यांना अखेरचें

वंदन केलें आणि कमळाइसेचा निरोप घेण्यासाठीं तो अंतर्गृहांत गेला. ती आपल्या बाळाला जवळ घेऊन बसली होती. हरपाळानें तिचा निःशब्द निरोप घेतला आणि तीनतीनदां अडखळणारें पाऊल उंबरठ्याच्या बाहेर टाकलें. भगवान् बुद्धानेंहि एके काळीं असाच यशोधरेचा आणि लहानग्या राहुलचा निरोप घेतला होता. यशोधरा प्रभूच्या पुनर्दर्शनानें धन्य होऊं शकली; पण अभागिनी कमलेला मात्र आपल्या प्रभूचें पुनर्दर्शन घडूं शकलें नाहीं.

० ० ०

रामटेकच्या मार्गावर वाटचाल करीत असतांना, घरीं निरोप पाठविण्याच्या निमित्तानें हरपाळानें आपल्याबरोबरच्या परिवाराला दूर केलें. देऊळवाड्याच्या मुक्कामांत उरलेल्या दोन प्रामाणिक सेवकांनाहि काजळेश्वराच्या मंदिरांत निद्रिस्त अवस्थेंत सोडून त्यानें रामटेकची वाट सोडून ऋद्धिपूरची वाट धरली. ऋद्धिपूरला गोविंदप्रभु नामक एका जीवन्मुक्त महापुरुषाकडून शक्तिस्वीकार केल्यावर हरपाळानें 'चक्रधर' असें नांव स्वीकारलें आणि एका विदेही मुक्तावस्थेंत, आध्यात्मिक उन्मनस्कतेंत भ्रमण सुरू केलें. या काळांत चक्रधराला अंगावरच्या वस्त्राची शुद्ध नव्हती, कीं कांट्याकुट्यांनीं व दगडधोंड्यांनीं रक्ताळलेल्या शरीराची जाणीव नव्हती. भ्रमण करतां करतां तो जवळच्या सालबर्डीच्या निसर्गरम्य डोंगरावर आला आणि तेथील प्रशान्तगंभीर वातावरणांत त्याची उन्मनस्क वृत्ति चिन्तनशील बनली. चक्रधरानें सालबर्डीच्या निर्मनुष्य वातावरणांत मौनावस्थेंत बारा वर्षें काढलीं. शेवटीं मौनाच्या गाभाऱ्यांत सत्याचें सहजस्फुरण झालें आणि असीम करुणेचें रूप घेऊन अहिंसा नेत्रांतून ओसंडूं लागली. स्वतःच अंधश्रद्धेनें निर्माण केलेल्या पाशांत गुदमरणाऱ्या समाजाला उन्मुक्त करण्याचें मृत्युंजयी सामर्थ्य हृदयांत संचरूं लागलें.

० ० ०

या साक्षात्कारानंतर चक्रधरानें सालबर्डीचा डोंगर सोडला आणि विंध्याच्या परिसरांतील गोंडांच्या आणि गोपाळांच्या वस्तींतून त्यानें परिभ्रमण सुरू केलें. आपल्या झोंपडींत विसावणारा, आपल्याबरोबर मीठभाकर खाणारा हा कनवाळू मनाचा महात्मा त्यांना देवासारखा पूज्य वाटूं लागला. गोंड लोक चक्रधराला आदरानें 'देवन्य' म्हणत. या आदिवासी श्रद्धाळू लोकांत बराच काळ भ्रमण केल्यावर चक्रधरानें आंध्र-कर्नाटकांत संचार केला. परंतु तिथें त्याला अनुकूल भूमि आढळली नाहीं. त्या परिसरांत वामाचारी तंत्रसाधनेचा भयंकर पगडा असल्यानें चक्रधर फार काळ तिथें थांबला नाहीं. आपलें कार्यक्षेत्र म्हणून त्यानें महाराष्ट्राची निवड केली आणि तिथेंच तत्त्वोपदेशाची 'अथश्री' करण्याचें त्यानें ठरविलें.

या संक्रमणाच्या काळांत चक्रधरानें जें भ्रमण केलें, तें सहेतुक होतें. सामाजिक जडतेचें मूलकारण शोधण्याचा त्याचा प्रयत्न होता. वैदिक कर्मकांडाचा निरर्थक पसारा, चातुर्वर्ण्याची जाचक भिंती, देवदेवतांचें प्राबल्य, वामाचारी साधकांनीं चालविलेली बहुजनांची दिशाभूल, शौचाशौचाच्या कल्पनांमुळें होणारा मानवाचा भयंकर अवमान, स्त्रीजातीची अन्याय्य परवशता या गोष्टींचें चक्रधरानें स्पष्ट आकलन करून घेतलें आणि द्रष्ट्याच्या भेदक दृष्टीनें नवजीवनाचें चित्र आपल्या मनांत चितारलें.

पण हें घडविणें सोपें नव्हतें. धर्माचें रक्षण करण्याचा आव आणणारे धर्ममार्तंड आपलीं शस्त्रें परजून सिद्ध होते. पैठण हा कर्मठ वैदिकांचा बालेकिल्ला होता. महाराष्ट्राचें तें प्रधान धर्मक्षेत्र होतें. पैठणपासून देवगिरी ही महाराष्ट्राची राजधानी जवळच असल्यानेंहि पैठणला अधिक महत्त्व आलें होतें. महाराष्ट्राच्या सर्व भूभागांतून धर्मकृत्यांसाठीं दक्षिण-गंगेच्या कांठावरील या पवित्र नगरींत अनेक लोक येत असत. त्यामुळेंच आपलें नवविचार-प्रवर्तन करण्यासाठीं चक्रधरानें पैठणचीच निवड केली. पैठणला इ. ११८५ च्या सुमाराला संन्यासदीक्षा स्वीकारून त्यानें धर्मचक्रप्रवर्तन

सुरू केलें : “ जीवोद्धरणासाठीं अधिकारी व्यक्तींना त्यांच्या पात्रतेनुसार ज्ञान किंवा प्रेम देणें, जे ज्ञानाला किंवा प्रेमाला अजून पात्र झाले नसतील, त्यांना ती पात्रता यावी म्हणून त्यांच्याकडून पुण्याचरण करवून घेणें, ईश्वराव्यतिरिक्त अन्य जीवदेवतांच्या भजनीं लागलेल्यांना त्यापासून सोडवून परमेश्वरसेवेला लावणें, त्यासाठीं आपल्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करणें, या अनेकविध कार्यासाठीं त्यानें आपलें सर्व आयुष्य वेंचायचें ठरविलें. ” या उद्दिष्टानुसार त्यानें महाराष्ट्रांत धर्मयात्रा सुरू केली आणि महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यांत पसरलेल्या सामान्य जनतेंत आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रसार चालविला. उत्तरेकडे सालबर्डीचा डोंगर, पूर्वेकडे भंडारा, दक्षिणेकडे पारनेर आणि पश्चिमेकडे त्र्यंबकेश्वर या चतुःसीमांनीं त्याच्या परिभ्रमणाची व्याप्ति सांगतां येईल.

या भ्रमणकाळांत त्याच्याभोंवतीं शेंकडों शिष्य जमा झाले; महाराष्ट्रांतील प्रथम श्रेणीचे विद्वान् आकर्षिले गेले; व्रतवैकल्यांत खुरटणाऱ्या स्त्रियांनीं त्याचें अनुसरण केलें आणि ‘ महानुभाव ’ अथवा ‘ महात्मा ’ पंथाचें महाराष्ट्रांत दृढ संघटन झालें. ‘ महानुभावत्व ’ वा ‘ महात्मता ’ अंगीं बाणविणें हें या पंथाचें प्रधान उद्दिष्ट होतें. स्वतः चक्रधर या महात्मतेचा परम आदर्श होता.

० ० ०

चक्रधराचें व्यक्तिमत्त्व अहिंसेच्या मुशींत साकारलें होतें. सर्वांविषयीं प्रगाढ प्रेम हा त्याचा स्वभावच बनला होता. विंध्यपर्वतांतील गोंडांशीं आणि गोपाळांशीं त्यानें आत्मीयता मानली, लहान मुलांशीं समरस होतांना स्वतःचें प्रौढत्व विसरून ‘ साळैचें घर मेणाचें ’ अशा रंजक कथा त्यांना सांगितल्या; गांजलेल्या स्त्रीजातीला उद्धाराचें आश्वासन दिलें, परिवारांतील सर्वांना समभावानें आणि ममतेनें वागविलें आणि मातंगाच्या घरचें अन्नहि त्यानें प्रेमानें ग्रहण केलें. जीवाला शब्दानें दुखविणें हीसुद्धां हिंसा

आहे, असें चक्रधर मानी. आश्रमवासीयांनीं इतरांचें अन्तःकरण दुखवलेलें त्याला मुळींच खपत नसे. असें घडलें तर अपराध्याची तो आश्रमांतून हकालपट्टी करी. " प्राणिये एथ आलेया जळता जावें, तरि निवावें कोठें ! " असा त्याचा रास्त प्रश्न असे. ' हिंसा वर्ते तिये स्थानीं महात्मेया असों नये ' असा त्याचा दंडक होता. ' मुक्तीची चाड : तेणें मुंगिये वीरु न चिंतावें : '— मुक्तीसाठीं प्रयत्न करणाऱ्यांनीं मुंगीशींसुद्धां वैर चिंतू नये, असा अहिंसावृत्तीचा परमोत्कर्ष चक्रधराच्या ठिकाणीं झाला होता. षड्रिपूंचा त्याग हाच संन्यास आणि अहन्तेचें उन्मूलन करून शांतीचें बीजारोपण करणें, हाच परमार्थ, असे विचार त्यानें वारंवार व्यक्त केले आहेत.

चक्रधराचें व्यक्तिमत्त्व अत्यंत प्रभावी होतें. ' चापेगौर गोमटी ' मूर्ति, अन्तरींच्या सोज्वळ भावनेचें मुखावर विलसणारें अपूर्व तेज, हृदयाचा ठाव घेणारी वाणींतील तळमळ आणि सहजसुमम असा वक्तृत्वाचा ओघ यांमुळें त्याच्याभोंवतीं एक अपार्थिव दिव्यतेचें वलयच पसरलेलें असे. अहिंसक मनोवृत्तीला स्वयंप्रज्ञेची आणि प्रगाढ अध्ययनाची जोड मिळाल्यामुळें अन्यमार्गीयहि त्याच्यापुढें सहज पराभूत होत. शिवाय, परमताविषयीं सहिष्णुता आणि मतप्रचारापेक्षां कल्याणभावनेचा आवेग यांमुळें अन्यमार्गीय आपण होऊनच चक्रधराकडे आकर्षिले जात. वेदोप-निषदें, गीता, आगम ग्रंथ, लौकिक विद्या आणि समकालीन विचारप्रवाह यांचें सूक्ष्म अध्ययन त्यानें केलें होतें. त्याच्या विरक्तवृत्तीला रसिकतेचें वावडें नव्हतें. विनोदी आणि खेळकर मनोवृत्ति हा चक्रधराच्या व्यक्ति-मत्त्वाचा एक आगळा विशेष होता.

या स्नेहल वृत्तीनें महाराष्ट्रांतील जनमनाला वेड लावलें, हें जरी खरें असलें, तरी त्याची बंडखोर विचारसरणी महाराष्ट्राला—महाराष्ट्रांतील धर्माभिमानींना—मानवणें अशक्य होतें. त्याच्या विद्रोहिणी मनोवृत्तीनें महाराष्ट्रां-

तील अन्धश्रद्धेला धक्का दिला. अहिंसेच्या अधिष्ठानावर बुद्धिवादी दृष्टि-कोनांतून सार्वत्रिक समतेची प्रस्थापना करण्याचें ध्येय त्यानें बाळगलें होतें. तत्कालीन महाराष्ट्रांत ही बंडखोरी सहन होणें अशक्य होतें. हेमाद्रीसारखा कर्मठ ब्राह्मण्यवादी राजदंड हातीं घेऊन वैदिक कर्मकांडाचें आणि निष्फळ व्रतवैकल्याचें राज्य निर्माण करीत होता. अशा स्थितींत वेदप्रामाण्य झुगार-णारा, चातुर्वर्ण्याच्या चौकटी उद्ध्वस्त करूं पाहणारा, स्पृश्यास्पृश्यांना एका पंक्तीला बसविणारा, संस्कृतचें माध्यम नाकारून लोकभाषेंतून उपदेश करणारा आणि अनेक देव-देवतांची पूज्यता अमान्य करणारा हा बंडखोर महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत आपले विचार प्रसृत करीत आहे, हें तत्कालीन धर्मरक्षकांना कसें सहन होणार !

० ० ०

पैठणच्या धर्ममार्तंडांचें पित्त खवळलें, चक्रधराच्या व्यक्तिमत्त्वानें आणि उपदेशानें महाराष्ट्र भारावला जात आहे आणि वैदिक कर्मकांडाचें उच्छेदन होत आहे, हें त्यांच्या डोळ्यांना सहन होईना ! 'धर्म बुडतो आहे !' अशी एकच हाकाटी त्यांनीं सुरू केली. त्या मूठभर मत्सरी पंडितांचा नेता महदाश्रम सूडानें पेटला. आपला प्रभाव कमी होत आहे आणि कुठल्याहि सौम्य मार्गांनीं वा धर्मचर्चेनें आपण चक्रधराला आवरूं शकणार नाहीं, अशी न्यूनतेची जाणीव झाल्यामुळें त्यानें राजसत्तेचा आश्रय घेऊन चक्रधराला दडपण्याचें ठरविलें. त्या वेळीं देवगिरीचा करणाधिप हेमाद्रि हा कर्मठ वैदिक पंडित होता. त्याचें आणि महदाश्रमाचें सूत जमलें आणि चक्रधराचा घात करण्याचें कृष्ण कारस्थान शिजलें. आश्चर्य असें कीं, या कृष्ण कारस्थाला 'न्यायाचें पोषण करणाऱ्या' आणि 'धर्माचा पुनरुद्धार करणाऱ्या' श्रीरामचंद्र यादवाचाहि पाठिंबा मिळाला.

हेमाद्रीनें सैनिक पाठवून चक्रधराचा आश्रम उद्ध्वस्त केला; त्याला पकडून नेऊन त्याचें अवयवच्छेदन केलें. आणि शेवटीं तेवढ्यानेंहि समाधान

न झाल्यामुळें बेलापूरजवळील तळ्याच्या कांठीं चार मांगांकडून त्याचा शिरच्छेद करविला. ही घटना ७ फेब्रुवारी १२७४ रोजीं घडली. ‘ सनातन धर्म ’ फोफावूं लागला आणि ‘ ईश्वरनिर्मित ’ भेदांना मूठमाती देऊं पाहणाऱ्या ‘ पांखंड्या ’चा नायनाट झाला ! या धर्मविजयानें महदाश्रमादि धर्मपंडित संतुष्ट झाले आणि त्यांनीं स्वकपोलकल्पित कथा रचून चक्रधराचें चारित्र्य दूषित असल्याचा प्रचार चालविला. त्यांनीं त्याचें महानुभावत्वच त्याच्या अवमानाचें बिरुद बनविलें.

पण चक्रधर मात्र या विटंबनेच्या वेळीं अविचल होता. त्यानें हें हौतात्म्य धीरोदात्तपणें पत्करलें आणि यादव-सैनिकांशीं दोन हात करूं पाहणाऱ्या नागदेवाला परावृत्त करून अहिंसावृत्तीचा प्रत्यय घडविला.

० ० ०

जन्मानें गुजराथी असूनहि चक्रधरानें महाराष्ट्राला धर्मभूमीचें स्थान दिलें आणि मराठीला धर्मभाषा बनविली. अज्ञ जनता ज्ञानवंचित राहूं नये म्हणून त्यानें लोकभाषेचा आग्रह धरला. आपले विचार जनतेला सहजतेनें कळावेत, म्हणून ते सोप्या भाषेंत आणि लोकांत प्रचार पावलेल्या कथांनीं व दृष्टान्तांनीं स्पष्ट केले. मठाच्या चव्हाट्यावर त्रिकाळ प्रवचनें करून ज्ञानदानाची गवांदी घातली आणि विचारप्रतिपादनानें मराठीचें सामर्थ्य वाढविलें. चक्रधरानें निरूपिलेलीं सिद्धान्तसूत्रें, तत्त्वज्ञान आणि आचारधर्म यांचें शास्त्रशुद्ध व सर्वस्पर्शी दर्शन घडविणारीं आहेत. चक्रधरानें मराठी वाङ्मयांत एक स्वतंत्र अशी परंपरा निर्माण केली. त्यानें प्रत्यक्ष एकहि ग्रंथ लिहिला नसला तरी सर्व महानुभावीय वाङ्मयाची प्रेरक शक्ति आणि प्राणभूत विषय चक्रधराचें जीवनच आहे. याचमुळें सर्व महानुभावीय वाङ्मय-निर्मितीचें प्रेरक स्थान म्हणून मराठीनें चक्रधराचें ऋण सदैव मानलें पाहिजे.

मराठी वाङ्मयाच्या प्रारंभकाळींच या पंथानें मराठींत श्रेष्ठ दर्जाचें साहित्य निर्माण केलें आणि आपल्या मायबोलीचें वैभव वाढविलें. मराठी

वाङ्मयाचें सुवर्णयुग घडविण्यांत महानुभाव पंथाचा फार मोठा वांटा आहे. तेराव्या शतकांत महानुभावी वातावरणांत प्रज्ञा आणि प्रतिभा बहरास आली होती. या काळांत महानुभाव ग्रंथकारांनीं आदर्श चरित्रग्रंथ निर्माण करून मराठी गद्याचें सहजसुंदर दर्शन घडविलें; पंचमहाकाव्यांच्या तोलाचे काव्यग्रंथ निर्माण करून मराठी कवितेची प्रतिष्ठा वाढविली; तत्त्वज्ञानावरील शास्त्रीय ग्रंथ लिहून ज्ञानाचीं कवाडें सर्वांना खुलीं केलीं आणि आपल्या व्यापक अनुभूतीच्या आविष्कारांतून तत्कालीन महाराष्ट्राचें सर्वांगीण चित्र चितारलें. महानुभावीय वाङ्मयांत विविधता आहे आणि सरसताहि आहे. हें वाङ्मय निर्माण करणाऱ्या साहित्यकारांजवळ भावनेची उत्कटता होती, प्रतिभेची उज्वलता होती आणि ज्ञानाची व्यापकताहि होती. परस्परांच्या जिव्हाळ्यानें भारावलेले, काव्यशास्त्रविनोदांत धुंद झालेले आणि अन्तर्बाह्य पावित्र्यानें नटलेले हे परमार्थाचे सहप्रवासी मराठी वाङ्मयाचे फार मोठे शिल्पकार ठरले. त्यांच्या वाङ्मयऋणांतून मुक्त होणें आपणांस शक्यच नाहीं. केवळ महाराष्ट्रांतच नव्हे, तर उत्तरेकडे सिंधूच्या पैलतीरापर्यंत महानुभाव मठांतून मराठी ग्रंथांचीं आजहि तन्मयतेनें पारायणें होतात. अठराव्या शतकांत राघोभरारीनें, शस्त्रबळानें मराठ्यांचा झेंडा सिंधूपार नेला आणि राघोबाची पाठ फिरतांच लगेच ती शस्त्रनिर्मित सत्ता नष्ट झाली. पण राघोबापूर्वीं पांचशें वर्षे प्रेम आणि अहिंसा यांच्या बळावर महानुभावांनीं जो दिग्विजय केला, त्याच्या खुणा आजहि सिंधूपार आढळतील. आजहि अनेक अन्य-भाषिक आणि अन्यप्रांतीय लोक महाराष्ट्र आणि मराठी यांना परमश्रद्धेय मानणारे आढळतील !

'साधना', ४ फेब्रुवारी १९५६

# ज्ञानेश्वर

ज्याच्या स्पर्शांतून फुलांनीं कोवळीक शिकावी, वाणींतून अमृतानें माधुर्य लुटावें आणि दिठींतून पूर्णिमेनें शीतलता अनुभवावी, त्याचा सहवास किती सुखद असेल! त्याच्या सहवासांत विष अमृताचा ध्यास घेत असेल, मरण चिरजीवनासाठीं तपस्वी बनत असेल आणि वेदना सन्तृप्तींत विरून जात असेल. याच कल्पनेनें माझें वेडें मन त्याचा ध्यास घेतें, त्याच्या आठवणीनें विव्हळ होतें. वाटतें, त्याच्या संजीवक स्पर्शानें जीवनाचें सोनें व्हावें आणि त्याच्या दिठीच्या चांदण्यांत अमृतानें न्हाऊन निघावें.

• ० ०

आणि मग उत्कंठा शतकांच्या पावलांनीं धावूं लागते......पाहतां पाहता माझें मन इंद्रायणीच्या तीरावरील त्या एकाकी झोपडींत प्रवेश करतें. ज्यानें उभ्या महाराष्ट्राला माऊलीची माया दिली, त्याच्या पोरके-पणानें डोळे पाणावतात आणि जीव गलबलून जातो. अजून ज्यांना पंखहि फुटले नाहींत, अशा पिलांना घरट्यांत ठेवून आईनें चारा आणायला जावें आणि त्या कोवळ्या जीवांना कायमचें अंतरावें—तशीच ती स्थिति. कधींहि न भेटणाऱ्या आईची वाट पाहणाऱ्या त्या वेड्या पोरांकडे पाहून क्षणैक काळाचेंहि हृदय फाटून जात असेल. मनांत येतें, यांचें छत्र हिरावून घेणाऱ्यांना हृदयच नव्हतें का!

पण त्या महामानवाच्या मनांत अशी उद्वेगाची, कटुतेची छाया कधींहि तरळली नाहीं. बाळाची वाट पाहणाऱ्या आईच्या डोळ्यांत जें कांहींसें हळुवार असतें, त्याचाच प्रत्यय मला त्याच्या स्नेहाळ आलोकांत येई. तो कारुण्यांत पावलें लपवीत आणि जीवातळीं जीव आंथरीत चालूं लागला कीं त्याच्या स्नेहानें दिशा भारावत आणि वाटेवरील अणुरेणूंतून कृपा ओथंबूं लागे.

० ० ०

ज्ञानेश्वराचें व्यक्तिमत्त्व म्हणजे प्रेम, प्रज्ञा आणि प्रतिभा यांचें प्रयागतीर्थ. त्याच्या प्रेमानें चराचराला धवळलें होतें, प्रज्ञेनें सर्वज्ञतेला कळवलें होतें आणि प्रतिभेनें विधात्यालाहि लाजवलें होतें. युगानुयुगें चाललेल्या पूर्णतेच्या प्रवासांतील अखेरचें पाऊल टाकण्यासाठींच त्याचा जन्म होता. आपल्या अपार्थिव सामर्थ्याचें रहस्य त्यानेंच एक ठिकाणीं स्पष्ट केलें आहे :

मोटकी देहाकृति उमटे
निजज्ञानाची पहांट फुटे
सूर्यापुढें प्रकटे
प्रकाशु जैसा ॥
तैसी दशेची वाट न पाहतां
वयसेचिया गांवा न जातां
बाळपणींच सर्वज्ञता
वरी तयातें ॥
तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें
मनाचि सारस्वतें दुभे
मग सकलशास्त्रें स्वयंभें
निघतीं मुखें ॥

या अलौकिकतेमुळेंच त्यानें लौकिक आघातांवर मात केली. त्याच्या अवतरणापूर्वी महाराष्ट्र जडमूढ होऊन पडला होता. त्यानें जाणिवेच्या मंदिरांत जीवनाची भूपाळी गायली आणि सह्याद्रीची आत्मशक्ति जागवली. त्याच्या आश्वासक हांकेला साद देण्यासाठीं अस्थींतून दधीचि जागे झाले आणि रक्षेंतून ' कळिकाळाचा माथा फोडणारे ' फिनिक्स झेपावले. त्याच्या स्पर्शानें महाराष्ट्रांतील शिळांतून चित्कळा फुलल्या, मातींतून शांति अंकुरली आणि तृणपर्णांतून वज्रशक्ति पालवली. त्याच्या मृत्युंजयी प्रेरणेनें दासी जनीनें भक्तीचीं उपनिषदें गायलीं आणि यातिहीन चोख्यानें भावनेच्या चोख-पणाचें महिमान उद्घोषिलें.

० ० ०

केवळ एकवीस वर्षांचा जीवनकाळ. खरें म्हटलें तर एवढ्या अवधींत उच्चतम साधनेचा श्रीगणेशाहि अशक्यच. हा महात्मा एकवीस वर्षांत सर्व कांहीं आटोपून, कृतार्थ हृदयानें निघून गेला. मानवी मोजमापानें त्याच्या मनाचें नि जीवनाचें क्षेत्रफळ मोजणार तरी कसें ? दाही दिशांनीं आकाशाला मिठी देण्यासाठीं भुजा पसराव्या, तसें चराचर विश्व त्याच्या अनुभूतीच्या कवेंत सामावलें होतें.

जेव्हां समाजानें उपेक्षिलें, द्विजानीं वाळींत टाकलें आणि आप्तांनीं उपहासिलें, तेव्हां तो खचला नाहीं, तापला नाहीं. रात्रभर अंधारांत लुप्त झालेला सूर्य जसा पहांटे अमृताचा शिडकाव करीत प्रकट होऊं लागतो, तसाच ज्ञानेशहि अज्ञातवासांत शुभंकर शक्तींचा संचय करीत राहिला. समाजबहिष्कृत अवस्थेंत जिणें जगत असतांना त्यानें आपल्या भावंडांसह ज्ञान आणि सौन्दर्य यांची ल्यलूट केली.

तो कधीं गोरक्षाच्या विराट् यौगिक शक्तीचें रहस्य उकलीत बसे. तर कधीं ब्रह्मगिरीच्या माथ्यावर बसून योगेश्वर कृष्याच्या विचारांची व्याप्ति शोधी. कधीं एखाद्या आम्रतरूच्या तळवटीं बसून याज्ञवल्क्याच्या दृष्टींतून

ब्रह्माचें आलोडन करी, तर कधीं व्यासांचा मागोवा घेत सकल शब्दब्रह्माचें चिन्तन करी. दशोपनिषदांचा मकरंद त्यानें मनसोक्त चाखला होता आणि षड्दर्शनांचा परिपाकहि लुटला होता.

कधीं इन्द्रायणीच्या तीरावर, कधीं गोदेच्या संगमावर, तर कधीं ब्रह्मगिरीच्या चढणीवर असतांना त्याला मीं पाहिला आहे. डोळ्यांच्या अंजुळींतून सौन्दर्याचें आमचन करीत तो भटकत असे. वर्षाकाळाच्या प्रारंभीं महात्म्याच्या कृपेप्रमाणें बरसणारें आकाशाचें हृदय पाहून त्याचें मनहि सहानुभवानें ओसंडूं लागे. जळधारांत न्हाऊन निघालेलीं आणि हिरव्या रोमांचांनीं मोहरलेलीं सह्यगिरीचीं शिखरें पाहून तो आनन्दविभोर होत असे. कोवळ्या कोंबांतून भूमीच्या मार्दवाचीं गीतें पालवूं लागलीं कीं त्याच्या ओठांवरहि स्वरांची कोषळीं पालवी लसलसूं लागे.

० ० ०

शरद् तर त्याचा ऋतु. चकोरतलगांच्या हळवेपणानें शारदीय चंद्रकळेंतील अमृतकण टिपूण घेतांना त्याचें भान हरपून जाई; शरदाच्या ओलाव्यानें चंद्रबिंब पालवूं लागलें कीं त्याच्या हृदयालाहि हर्षाचें भरतें येई. पूर्णिमेच्या उत्तररात्रीं साऱ्या आसमन्ताला सुखाची शिरशिरी भरली कीं तो गोदावरीच्या कांठानें उगाचच भटकत राही आणि जळ-लहरींवर नाचणाऱ्या 'चंद्रिकेच्या वेलीं'चा फुलोरा पाहतांना सौंदर्य-समाधींत धुंद होई. अशा स्थितींत त्याला निद्रेचेंहि भान राहत नसे; आणि मग पहांटेच्या दंवानें सर्वांग भिजल्याबर तृणपर्णांशीं हंसत नि फुलांशीं खेळत तो कुटिराकडे परत फिरे.

० ० ०

वृक्षांवर नव्या पालवीचे रोमांच उभे करणारा, वेलींना मंदानिळानें सुखस्पर्श करणारा आणि आनंदजळानें फुलांचे डोळे ओलावणारा वसंतहि या गंधवेड्या ज्ञानेशानें लुटला आहे. वसंताच्या आगमनानें कोकिळांच्या

कंठांतून उमलणारें स्वरवैभव, लताकुंजांतून बहरलेला फुलोरा, पुष्करिणींतील कमळांतून ओसंडणारा आमोद आणि वाऱ्यावर वाहणारा सुगंध यांच्या आस्वादानें भरलेले कितीतरी क्षण त्यानें अनुभवले आहेत. गोदा-प्रवरा यांच्या प्रशांत संगमावर उभें राहून, क्षणसन्तृप्त आणि चिरसन्तप्त पाश्चिमेच्या भावनांचे बदलते रंग त्यानें भुकेल्या डोळ्यांनीं न्याहाळले आहेत. अन् मग त्या भावसघन मनःस्थितींत कुठून तरी येणाऱ्या संगीताच्या लहरींवर तरंगत घरीं परतल्यावरहि त्या सरलेल्या गीताची स्मृति सारी रात्र जागवीत असे.

वैजयन्तीमाळेनें शोभणाऱ्या मेघश्यामाप्रमाणें दिसणारा इंद्रधनुष्यान्वित मेघ, चन्द्रदर्शन होतांच लक्ष योजनांवरून त्याला मिठी देणाऱ्या कुमुदिनीचा अपार्थिव अनुराग, सूर्याच्या कोवळ्या स्पर्शानें सारा संकोच दूर सारून उमलणाऱ्या पद्मिनीची आगळी प्रीति, केसरांना धक्का न लावतां कमळांवर विसांवणाऱ्या भ्रमराचें हलुवारपण, यौवनाच्या उंबरठ्यावर पाऊल टाकणाऱ्या अंगनेच्या अंगांगांतून निथळणारी लावण्याची नव्हाळी, सुखस्मृतींप्रमाणें तनमनाला दर्वळून टाकणारा फुलांचा सुगंध, मुकुळाचा तीक्ष्ण पण मवाळ स्पर्श, कापुराची उटी ल्यालेल्या महेशाप्रमाणें शोभणारा हिमगिरि. . .अशीं कितीतरी सौंदर्यनिधानें त्याच्या मनःकोशांत संचित होतीं.

• • •

एकदां गोदावरीच्या परिसरांतील त्या रम्य तपोवनांत मरणाचेंहि मरण पाहणारी योगसाधना त्यानें सुरू केली. जिथल्या रमणीयतेनें तप स्वयमेव रूप धरतें आणि अनुभूति हृदयाला वरते, असें तें लोभस तपोवन! शांति अन् प्रसन्नता तेथील अणुरेणूंतून निथळत होती. त्या रमणीय परिसरांत एक प्रशान्त शिवालय होतें. त्या शिवालयाच्या सान्निध्यांतच ज्ञानेश्वरानें ती चिरस्मरणीय साधना सुरू केली. हृदयाच्या गर्भागारांत आत्मज्योतीच्या प्रकाशांत शिव-दर्शन घेऊं पाहणारी उत्कण्ठाच जणुं आसनस्थ

झाली ! क्षणांचीं कांहीं पांखरें मनोवेगानें भिरभिरत गेलीं आणि पाहतां पाहतां सिद्धीच्या अन्तिम क्षणाचा सुवर्णहंस ज्ञानेशाच्या पदकमळांवर विसांवला.

अमृताची पहांट धवळली. हृदयपुष्करांतून ' प्रकाशजळाची झरी ' वाहूं लागली. जीव ' आनन्दाच्या दोंदा 'वर लोळूं लागला. त्याच्या इवल्याशा नेत्रकळिकांत आकाश लपीथपी खेळूं लागलें. आधींच कान्तिमान् असलेल्या देहांत आगळेंच सौन्दर्य संचारलें. संध्येचा लालस लालिमा मुसावल्यासारखें तें रूप ! नितळपणांत सोनचांफ्याचा कळा नि मोहकतेंत अमृताचा पुतळा ! जणुं स्फटिकांत चैतन्य संचारलें आहे—जणुं रत्नबीजाला तेजाचे कोंभ फुटले आहेत. मोत्यांची पक्वता दाटल्यामुळें शिंपल्यांची शिवणी जशी उतटते, तशी पापण्यांच्या कवळींतून झेपावणारी दृष्टि गगनाला गवसणी घालीत आहे. साधनेच्या वेदीवर तेज आणि शांति यांचें स्वयंवर झालें आहे !

यानंतरच त्यानें नेवाशाला मोहिनीराजाच्या साक्षीनें ' ज्ञानेश्वरी ' लिहिली. मूठभर पंडितांच्या हातीं गोठलेले ज्ञानामृताचे कुंभ ज्ञानेश्वरानें आपल्या वाङ्मोहिनीनें खुले केले आणि स्त्री-शूद्रांसाठीं ज्ञानाची गवांदी घातली. ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरींत शब्दांच्या माध्यमांतून अरूपाला रूप दिलें आणि अतींद्रिय इंद्रियांकरवीं भोगविलें. ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेच्या किमयेनें प्रमेय रुचीस आलें आणि महाबोधाच्या ठिकाणीं कोवळीक दुणावली. ज्ञानेश्वरी म्हणजे ज्ञानेशाची ' वाङ्मयी श्रीमूर्ति ' !—

सकळ धर्मांचें माहेर ।
सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्नभांडार ।
शारदेचें ॥

असें त्या ग्रंथाचें स्वरूप आहे. त्यामुळेंच हजारों वारकरी त्या ग्रंथाची 'आई' म्हणून पूजा बांधतात.

० ० ०

ज्ञानेश वनांत राहिला नाहीं, गिरिगव्हरांत लपला नाहीं आणि मठांत बसून घट-पटांच्या तर्कटांतहि रमला नाहीं. त्यानें 'जनीं जनार्दन पाहिला. त्या सर्वात्मकाची पूजा त्यानें स्वकर्मकुसुमांनीं बांधली. ज्ञानेशाच्या सहजसंचारानें महाराष्ट्रांतील रंजल्या-गांजलेल्या दीनदलितांना अपार जिव्हाळा लाभला. त्याचमुळें अखेर त्याचें रूप दृष्टीआड करतांना अवघा महाराष्ट्र आक्रोश करूं लागला.

बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट
ओघ बारा वाट मुरडताती !

अशा शोकाकुल मनःस्थितींत सर्वांनीं समाधीचा करुण-गंभीर प्रसंग अनुभवला. "आतां ऐसें कोणी होणें नाहीं !" असे हताश उद्‍गार वातावरणांत उसळले.

० ० ०

• आईच्या मायेला आंचवलेलें माझें मन सदैव त्याच्यामागें भिरभिरतें आहे. त्या हरपल्या श्रेयाचा शोध घेत तें कडेकपारीं भटकतें आहे. ज्ञानेश्वरीच्या शब्दाशब्दांतून त्याचें मनोमय रूप उभवून तें वेडें समाधान करून घेत आहे. पण अशानें त्याचें समाधान होत नाहीं. त्याचा खुळा ध्यास कांहीं केल्या सरत नाहीं. ज्ञानेशाचें सगुण साकार रूपडें साक्षात् प्रकटावें आणि आपलें इवलेंसें हृदय चौफाळूनें त्याची इवलीशी पूजा बांधावी, असें राहून राहून वाटतें. ही माझ्या खुळ्या मनाची खुळी आशा कधीं पुरी होईल ? तो निराकारांत समरसलेला विराट् आत्मा नामयाच्या वेड्या इच्छेसाठीं पुन्हां सगुणसाकार होऊन आला होता म्हणे...मग मलाहि तो भेटेल का ?

क्षणैक नक्षत्रांचा डाव आवरून आणि चन्द्रसूर्याची चेंडूफळी थांबवून माझ्या आर्त हांकेला तो साद देईल का? त्यानें एकदांच. . .फक्त एकदांच प्रकटावें आणि आनन्दसरोवरांत आंदोळणाऱ्या कमळांसारख्या डोळ्यांतून माझ्यावर स्नेहाची वृष्टि करावी....

'साधना', ? डिसेंबर १९५६

# बसव आणि नानक

सन्तांचें जीवन सूर्याप्रमाणें असतें. सूर्य जसा बाह्यतः निश्चल राहून चराचराला उजळतो नि जगद्व्यापाराला चालना देतो, तसेच सन्तहि केवळ आपल्या आलोकानें समाजजीवन उजळतात आणि जडतेच्या अंधारांत उद्यांची आशा फुलवितात. सन्तांचें जीवन ही प्रगत विचारांची गंगोत्री असते. त्या विचारांमागें व्यापक अनुभूति आणि सखोल चिन्तन असतें. आणि त्याचमुळें सम्राटांना अन् मुत्सद्द्यांना आपलें सर्व सामर्थ्य वेंचूनहि जें घडवितां येत नाहीं, तें समाजाचें हृदयपरिवर्तन सन्त सहजीं घडवितात. पण कधीं कधीं समाजाची जडता पराकोटीला गेलेली असते; जाणिवा बोथटलेल्या असतात आणि विवेकावर अज्ञानाची दाट काजळी चढलेली असते. अशा वेळीं सन्तांना आपलें आन्तरिक सामर्थ्य कर्मांत परिणत करावें लागतें आणि प्रलयकालीन रवीच्या षोडशकलांप्रमाणें जडतेच्या प्रलयासाठीं प्रखरता धारण करावी लागते. बसव आणि नानक हे याच कोटींतील सन्त होते.

• • •

अक्षय्य तृतीयेला जन्मलेल्या या दोन महापुरुषांची कीर्ति अक्षय्य आहे. बसव हा कर्नाटकाच्या धार्मिक जीवनाचा प्राण आहे, तर नानक हा सिंध-पंजाबचा महात्मा आहे. दोघांच्या जीवनकालांत तीन-चारशें वर्षांचें अंतर असलें तरी दोघांचें जीवनकार्य व विचार यांत अत्यंत साम्य

आहे. दोघांनीहि आजन्म कर्मयोग आचरून दंभ, विषमता व अज्ञान यांविरुद्ध बंड उभारलें आणि आदर्श समाजरचनेचा निर्मितीचा प्रयत्न केला. दोघांचेंहि जीवन भक्तीनें भारलें होतें आणि सेवेनें तरारलें होतें. दोघांच्याहि विचारांत प्रखरता आणि विशालता होती. फरक इतकाच कीं, एकाचें जीवन राजकीय धामधुमींत व्यतीत झालें, तर दुसऱ्याचें जीवन शेतीच्या शांततेंत शांतपणें गेलें.

० ० ०

बसवाचा जन्म इ. स. ११३५ मध्यें कर्नाटकांत इंगळेश्वर बागेवाडी या गांवीं एका सुखवस्तु ब्राह्मण कुटुंबांत झाला. त्याचे मामा बलदेव कल्याणीच्या बिज्जल कलचूरीचे मुख्य प्रधान होते. मामांच्या मुलीशींच त्याचें लग्न झालें आणि मामांच्या मृत्यूनंतर तो बिजलाचा प्रधान बनला. त्याची साधना राजकार्याला यत्किंचितहि बाधक ठरली नाहीं. कारण ‘ सकल कर्म आज मला सहजगान ’ ही त्याची वृत्ति होती. बसवाचें जीवन सर्वच दृष्टींनीं सुखी होतें. अन्य मध्ययुगीन संतांप्रमाणें बसवाला प्रत्यक्षांत समाजांतील विषमतेनें होरपळावें लागलें नाहीं. जीवनांतील कटुतेचा प्रत्यक्षानुभव त्याला घ्यावा लागला नाहीं, असें असतांनाहि–स्वतः ‘ उच्चवर्णीय ’ अन् ‘ सधन ’ असतांनाहि–बसव सन्तुष्ट नव्हता. खरी उच्चता आणि सधनता प्राप्त करण्याठीं त्याचें मन तडफडत होतें. चिन्तनशीलता हा त्याच्या मनाचा फार मोठा विशेष होता. समाजांतील दुःखांची स्वतःला यत्किंचितहि झळ नसतांना, त्यानें समाज निरखला; विषमता-दंभ-अज्ञान यांमुळें चाललेलें समाजाचें सत्त्वशोषण जवळून पाहिलें आणि त्याविरुद्ध झगडण्याचें व्रत अंगीकारलें. लहानपणीं उपनयनाच्या प्रसंगापासूनच त्याची प्रखर बुद्धिवादी वृत्ति आणि विद्रोहिणी प्रज्ञा यांचा प्रत्यय येऊं लागला. आईबाप आणि ब्राह्मण पुरोहित यांना न जुमानतां, त्यानें उपनयनसंस्कार करून घेण्याचें नाकारलें. मद्यानें भरलेलें भांडें बाहेरून स्वच्छ करण्याचा

तो निष्फळ आणि निरर्थक प्रयत्न त्याला हास्यास्पद वाटला. या प्रसंगीं दाखविलेला शुद्ध बुद्धिवादच बसवाच्या सर्व साधनाक्रमांत अनुस्यूत आहे. त्याच्या भावुक गीतांपेक्षां दंभ-विषमतेविरुद्ध त्यानें चढविलेला शुद्ध बुद्धिवादी हल्लाच हृदयाचा अधिक ठाव घेतो.

० ० ०

नानकाचा जन्म इ. स. १४६९ मध्यें पंजाबांत लाहोर जिल्ह्यांतील तळवंडी या गांवीं खत्री जमातींत झाला. 'संसारत्याग हा ईश्वरप्राप्तीचा खरा मार्ग नाहीं' हा आईचा उपदेश शिरसावंद्य मानून त्यानें संयत अन् प्रपन्न गृहस्थाश्रम स्वीकारला आणि साधनेच्या इतिहासांत कर्मयोगी साधकाचा आदर्श निर्माण केला. हिंदु-मुस्लिम संघर्षाचें विकृत स्वरूप पाहून त्याचें मन वेदनांनीं विव्हळ झालें आणि माणसाला माणुसकी शिकविण्यासाठीं त्यानें फाकिरी पत्करली. धर्मांच्या नांवाखालीं माणूस माणसाचा गळा कापतो, हें त्या काळचें सार्वत्रिक दृश्यच इतकें भीषण होतें कीं, नानकासारखा स्वयंप्रज्ञ अन् सहृदय महापुरुष स्वस्थ बसणेंच शक्य नव्हतें. पहिल्या यात्रेंत उत्तर आणि पूर्व भारत, दुसऱ्या यात्रेंत दक्षिण आणि सिलोन, तिसऱ्या यात्रेंत सिक्किम, भूतान, तिबेट व चीन आणि चौथ्या यात्रेंत अफगाण–अरबस्तान एवढा विस्तृत भू-प्रदेश त्यानें पायांखालीं घातला. बगदादहून परततांना तो बाकू, पर्शिया, तुर्कस्तान, काबूल, पेशावर या मार्गानें परत आला. सतत पंचवीस वर्षें सर्व आशियाभर भ्रमण करून त्यानें सहस्रावधि हिंदु-मुसलमानांना सम्प्रदायातीत मानवधर्माची दीक्षा दिली.

बगदाद येथें नानकाच्या उपदेशानें प्रभावित झालेल्या बहलोल नामक व्यक्तीनें नानकाच्या निर्गमनानंतर सतत साठ वर्षें इराणांत नानकाचा संदेश पसरविला. 'हिमालयाच्या गिरिगव्हरांतील शांतीचा महामंत्र बगदादच्या गुलाबबागांत' घुमवितांना बहलोलचें हृदय बेहोश झालें होतें. आजहि बगदाद येथें बहलोलच्या समाधीजवळ गुरु नानकाची प्रतिमा आहे.

पशुबलि, अनेकदेवतापूजन, तीर्थयात्रा, जपतप, व्रतवैकल्यें, स्पर्शास्पर्श, भविष्यज्ञान, भूतपिशाच्च या सर्व खुळ्या कल्पनांवर आणि कर्मकाण्डावर दोघांनींहि प्रहार केले आहेत. कर्मकाण्ड आणि पशुबलि यांचा प्रचार करणाऱ्या वेदांना मानायला बसवाचें बुद्धिवादी मन तयार नव्हतें. पुरोहितशाहीवर त्याची मुळींच श्रद्धा नव्हती. "आपल्या स्त्रीचा संभोग वा आपलें भोजन जसें दुसऱ्याकरवीं अशक्य आहे, तसेंच ईश्वराची पूजा दुसऱ्याकरवीं करविणें अशक्य व खुळेपणाचें आहे!" अशा नागड्याउघड्या शब्दांत बसवानें पुरोहितशाहीवर 'मूले कुठार:' आघात केला आहे. वाळू कातून धागा निघणें जसें अशक्य, तसेंच कर्मकांडापासून ईश्वरप्राप्ति अशक्य असल्याचें त्यानें स्पष्ट बजावलें आहे. शेणाच्या गणपतीची चांफ्याच्या फुलांनीं पूजा बांधली तर बाह्य शोभा वाढेल, पण घाण यायची राहणार नाहीं—मनांतील दुर्भावनांच्या लीला चालू असतांना बाह्य उपचारांचा काय उपयोग? सदाचार हाच स्वर्ग आहे आणि अनाचार हाच नरक!

नानकाचा परिवर्तन-मार्ग बसवाहून थोडा निराळा होता. तो वैचारिक प्रहार करण्याआधीं वाट चुकलेल्यांना शांतपणें विश्वासांत घेई आणि अत्यंत कुशलतेनें त्यांच्या खुळेपणाचें अनावरण करून सत्याचें दर्शन घडवी. नदींत उभें राहून पितृतर्पण करीत असलेल्या ब्राह्मणाचें खुळेपण घालविण्यासाठीं नानक त्याच्यासमोर उभा राहिला आणि ओंजळीनें तीरावर पाणी टाकूं लागला. ब्राह्मणानें विचारलें, 'आपण हें काय करतां?' नानक उत्तरला, 'दूरवर असलेल्या माझ्या शेतांना पाणी देतों आहें. आपण आपल्या स्वर्गस्थ पितरांना दिलेलें पाणी जर त्यांना पोंचतें, तर हें पाणी माझ्या शेतांना कां पोचूं नये?' ब्राह्मणाला आपलें खुळेपण समजलें आणि तो नानकाचा अनुयायी बनला. नानकाच्या जीवनांत अशा हृदयपरिवर्तनाच्या कथा अनेक आहेत. गुलामांचा व्यापार करणारा हृदयशून्य, शोषणांतून पैसा उभारणारा

धनिक, अहंकारानें फुगलेला मौलवी, हिंसेंतच विक्रम मानणारा दरोडेखोर असे अनेक प्रकारचे मत्त लोक नानकाच्या साधकसमाजांत संमिलित होऊन दीनदलितांची अखंड सेवा करूं लागले.

० ० ०

जातिभेद हा हिंदु समाजाचा जुनाट रोग आहे. या असंख्य भेदांनीं हिंदु समाजाचें जळवांप्रमाणें सत्त्वशोषण चालविलें आहे. बुद्धापासून गांधीं-पर्यंत अनेक महापुरुषांनीं हीं यातिकुळांचीं कृत्रिम बंधनें उखडण्याचा प्रयत्न केला, पण अजूनहि यावें तसें यश आलें नाहीं. उच्चनीचतेच्या कल्पना सर्व मानवजातीला छळीत आहेत. या निरर्थक कल्पनांविरुद्ध बसव आणि नानक या दोघांनीहि समर्थ विद्रोह उभारला. या विद्रोहांत नानक अंशतः यशस्वी झाला, तर बसवाला त्यासाठीं आत्म-बलिदान करावें लागलें.

सर्व माणसें जन्मानें सारखींच असतांना केवळ व्यवसायभिन्नतेनें एक उच्च आणि दुसरा नीच निर्माण व्हावा—ही कल्पनाच बसवाला सहन होत नसे. " कपडे धुणारा धोबी हीनकुलीन कां आणि ग्रंथाध्ययन करणारा ब्राह्मण उच्चकुलीन कां ? ब्राह्मणाचा जन्म काय कानांतून झाला आहे ? " असा बिनतोड प्रश्न बसवानें विचारला आहे. उच्चनीचता जर कुठें असेल, तर ती उच्चनीचभावनेंत आहे—ती जन्मानें ठरत नाहीं.

दुसऱ्यांची हिंसा करणारा तो चांडाळ, दुसऱ्यांना लुटून वा मारून पोट भरणारा तो अस्पृश्य ! जातीपातीला कांहीं अर्थ नाहीं. परस्त्री, परधन आणि परहित यांचा अपहार करणारे मात्र अस्पृश्य आहेत, चांडाळ आहेत—मग ते जन्मानें ब्राह्मण का असेनात. अन् सदाचारानें वागणारे, प्रभूच्या सेवेंत रंगणारे ते सारे उच्चकुलीन—मग ते जन्मानें अंत्यज का असेनात. सिरियाल, माचय्या, चेनय्या, चिक्कय्या, कक्कय्या, किन्नरी बोम्मय्या हे सारे भक्त हीनकुलीनच होते—पण अनेक उच्चकुलीनांनीं त्यांच्या

चरणांचें तीर्थ घ्यावें, इतकें त्यांचें पावित्र्य ! बसव म्हणे, "हे सर्व माझे सगेसोयरे आहेत. कर्मचांडाळांपेक्षां जातिचांडाळ मला अधिक जवळचे वाटतात."

० ० ०

समताप्रधान अहिंसक समाजाच्या निर्मितीचा बसवाचा हा प्रचंड खटाटोप क्रांतिकारी होता. बाराव्या शतकांत या कल्पना पाखंडी ठरल्या तर नवल नाहीं. पण या कल्पनांच्या प्रचारामागें एक चारित्र्यसंपन्न व्यक्तिमत्त्व होतें आणि राजदंडाचें प्रभुत्वहि होतें. त्यामुळें बसवानें आपल्या नवसमाजरचनेच्या कार्यांत अनेकांना खेचलें. पण युगांची जडता इतक्या सहज दूर होणें कठीण होतें. अंत्यजाचीं सावलीहि अपवित्र मानणारा ब्राह्मणवर्ग अन्त्यज-ब्राह्मण विवाहाला मान्यता देणें शक्य नव्हतें. आणि तो विवाह तर बसवानें पुरस्कारिला होता. अखेर खवळलेल्या रूढिदासांनी बिज्जलाचे कान फुंकले. बिज्जलानें निर्घृणपणें त्या नियोजित दंपतीची भररस्त्यांत हत्या केली. परिणाम व्हावयाचा तो झाला. नवकल्पनांनी प्रस्फुरण पावलेलें नवें रक्तहि खवळलें. विवेकाची मर्यादा सुटली आणि त्या महापुरुषाच्या विचारांना विसंगत अशी एक घटना घडली : बिज्जलाच्या अत्याचाराचा सूड घेण्यासाठीं कांहीं तरुणांनीं उत्साहातिरेकानें बिज्जलाचा वध केला. आणि अखेर हिंसेची परंपरा निर्माण होऊन बसवालाहि आत्मबलिदान करावें लागलें. जात्युच्छेदनाच्या इतिहासांत बसवाचें हें हौतात्म्य अविस्मरणीय आहे-वन्दनीय आहे !

० ० ०

नानकाच्या सर्व साधनेची प्रेरणाच जातिभेदांच्या परिणामाच्या जाणिवेंत आहे. हिंदु-मुस्लिम संघर्ष आणि त्या दोन्ही समाजांतील अन्तर्गत भेदभाव यांचें उन्मूलन करण्यासाठीं नानक जवळ जवळ सर्व आशियांत भटकला आणि खुळ्या भेदभावनांचा त्यानें धिक्कार

केला. नानक म्हणतो : " जाति आणि कुल याना कांहीं अर्थ नाहीं. जातिकुळांची उच्चता ही जन्मावरून ठरत नाहीं—कर्मावरून ठरते. सत्कर्म करणारा तो उच्चकुलीन अन् असत्कर्म करणारा तो चांडाळ ! " मर्दन हा मुस्लिम गायक नानकाचा लाडका शिष्य होता आणि कर्तारपूरला त्याच्या सान्निध्यांत सर्व जातींचे साधक समभावानें श्रमत होते. " तुम्ही माझे ' भाई ' आहांत. कारण आपण सारे त्या प्रभूच्या कुटुंबातील घटक आहोंत. चला—धरतीच्या धुळींत उत्साहानें श्रमूं अन् भुकेल्यांना अन्न देऊन त्याची पूजा करूं ! " असें व्यापक आवाहन नानक करीत असे. नानकाच्या मतें, कुणी मुस्लिम नाहीं नि कुणी हिंदु नाहीं. हिंदु आणि मुस्लिम या बाह्य आवरणांमागें केवळ ' माणूस ' आहे. हा ' माणूस ' ओळखणें हाच खरा धर्म !

० ० ०

बसव आणि नानक हे दोघेहि ' श्रमधर्माचे प्रेषित ' होते. केवळ नामस्मरणांत रंगून न जातां त्यांनी श्रमांत आणि सेवेंतच ईश्वराचें सान्निध्य अनुभवलें. दोघांनींहि कर्तव्यकर्माचा त्याग केला नाहीं. ' कर्मी भर होआवा निष्कामीही ' हें ज्ञानराजांचें सूत्र दोघांनींहि कटाक्षानें आचरिलें. बसव कर्नाटकाचा प्रधान, तर नानक पंजाबचा किसान—पण दोघांच्याहि कर्म-जीवनाचें अधिष्ठान एकच होतें—

तया सर्वात्मका ईश्वरा
स्वकर्मकुसुमांची वीरा
पूजा केली, होय अपारा—
तोषालागीं ।

सेवावृत्तीनें अन् निरहंकारबुद्धीनें केलेलें कर्म हीच दोघांचीहि साधना होती. लोखंड घडविणारा लोहार अन् अध्ययन—अध्यापन करणारा ब्राह्मण या दोघांच्याहि श्रमाचें मूल्य सारखेंच आहे—लोखंड ठोकल्यानें लोहार

हीन ठरत नाहीं आणि ग्रंथ पढल्यानें ब्राह्मण उच्च ठरत नाहीं—समाज-पुरुषाच्या सेवेसाठीं दोघांच्याहि श्रमांची सारखीच आवश्यकता आहे—असें बसवानें अनेकवार म्हटलें आहे. स्वतः बसवानें अखेरच्या क्षणापर्यंत कर्मयोग आचरिला. "श्रम केल्याशिवाय अन्न खाण्याचा कुणालाहि अधिकार नाहीं" असें बसवानें निक्षून सांगितलें आहे. मोळीवाला, चांभार, लोहार, विणकर या श्रमजीवी वर्गांविषयीं बसवाला अपार सहानुभूति वाटे.

गुरु नानकाला तर मातीविषयीं आणि मातींत खपणाऱ्या किसानां-विषयीं अतिशय आत्मीयता वाटे. आपली प्रदीर्घ यात्रा संपविल्यावर तो कर्तारपूरला स्थायिक झाला आणि तेथें शेतकऱ्याचें श्रमजीवन व्यतीत करूं लागला.

० ० ०

या किसान गुरूनें श्रमाचें महिमान खूप वाढविलें. श्रम, स्मरण आणि सेवा ही त्याच्या साधनेची तत्त्वत्रयी होती. कर्तारपूरला नानकानें 'लंगर' उघडलें. तो या 'लंगर'मधून सर्वांना—स्त्रियांना आणि पुरुषांना, बालांना आणि वृद्धांना, श्रीमंतांना आणि गरिबांना, हिंदूंना आणि मुस्लिमांना, ब्राह्मणांना आणि चांडाळांना— विनामूल्य अन्न देई. तो म्हणे : "अन्न आणि पाणी प्रभूचें आहे. तो प्रसाद आहे. आणि माझा प्रभूहि या साऱ्यांच्या हृदयांत आहे."

नानक कर्तारपूरला स्थायिक झाल्यावर त्याच्या प्रेरणेचा स्पर्श मिळविण्यासाठीं काबूल आणि मध्य आशिया, आसाम आणि दक्खन येथून अफगाण आणि बलोच, तुर्क आणि तार्तर, सूफी आणि ब्राह्मण हे सारे साधक एकत्र आले आणि गुरूच्या चरणांशीं ते सारे आपले भेद विसरले. धरतीची देणगी लुटण्यासाठीं ते एकसाथ खपूं लागले. हे सर्व साधक धनिकांच्या संपत्तिदानांतून विकत घेतलेल्या गव्हाच्या शेतांत श्रमदान करीत आणि त्यांचा हा धर्मपिता त्यांच्याबरोबर अनवाणी खपे. . .घाम गाळी....

हिरवीं स्वप्नें रंगविणाऱ्या बीजांच्या हृदयांतील निःशब्द प्रार्थनेचें पान करी. किती हृदयस्पर्शी दृश्य असेल तें! मला वाटतें, त्या दृश्यांत व्यथित विश्वाच्या सर्व समस्यांचें उत्तर आहे.

हे सारे साधक श्रम आणि सेवेंतूनच प्रभूची पूजा करीत होते. कुठलाहि गाजावाजा, देखावा न करतां त्यांची साधना चालू होती. वाऱ्याच्या झुळकीनें डोलणाऱ्या गव्हाच्या हिरव्यागार शेतांत त्यांचा प्रभु साकारला होता—भुकेलेल्यांची भूक भागविण्यासाठीं...गुलामांना मुक्त करण्यासाठीं... दांभिकांना श्रम-सेवेचा धर्म शिकविण्यासाठीं...

० ० ०

कर्तारपूरच्या या साधकसमाजानें निःस्वार्थतेचा, साधेपणाचा, सहकाराचा आणि सेवेचा महान् आदर्श निर्माण केला. जमीन प्रभूची, जमिनींतून फुलणारें धान्य प्रभूचें, धान्यानें जगणारी जनताहि प्रभुच आणि आम्ही?—श्रमांनीं पूजा बांधणारे त्याचे विनम्र सेवक! वर्गविहीन मुक्त समाजाच्या निर्मितीचा हा नानकाचा प्रयत्न खरोखरच अपूर्व आहे—अवर्णनीय आहे.

वर्षत सकळ मंगळीं
ईश्वरनिष्ठांची मांदियाळी
अनवरत भूतळीं
भेटो तयां भूतां!

ही ज्ञानराजांची मनीषा कर्तारपूरच्या सहकारी शेतींत सफल झालेली होती कर्तारपूरच्या सुपीक मातींत, नदीनाल्यांत, वाऱ्यांत आणि झाडाझुडपांत नानकाचा प्रभु ‘पसायदाना’साठीं श्रमिक भक्तांची वाट पहात होते आणि नानक व त्याचे भाई श्रमदानांतून आपल्या प्रभूला प्रसन्न करीत होते. प्रसन्न प्रभूनें दिलेला प्रसादहि ‘तुझें तुलाच समर्पण’ म्हणून जनता-जनार्दनाला दिला जाई. हें सर्व विनयानें घडे—कारण कर्तृत्वाचा अहंकार या साधकांना स्पर्शहि करीत नसे. कर्ता—करविता तोच—त्याचेंच हें कर्तारपूर.

० ० ०

बसव आणि नानक हे दोघेहि लोकधर्मप्रणेते आणि लोकधर्मसाहित्य-कार होते. दोघांनींहि आपल्या उपदेशासाठीं प्रचलित लोकभाषेचा आश्रय घेतला. त्यांचें आवाहन साधें, सोपें आणि प्रत्ययकारी होतें. त्यांत कसलीहि गूढता वा अगम्यता नव्हती. याचमुळें त्यांचीं वचनें व गीतें देशी साहित्याचा बहुमोल ठेवा बनलीं आहेत. कानडी साहित्यांत बसवाच्या वचनांचें स्थान अनन्यसाधारण आहे. सर्वश्रेष्ठ वचनकार म्हणून कानडींत त्याचा लौकिक आहे. कर्नाटकाच्या लोकजीवनाची चिरंतन प्रेरणा बसवाच्या वचनांत आहे. आणि नानकाची गुरुबानी तर सिंध-पंजाबचें जीवनरसायन आहे. नानकानें पंजाबी साहित्यांत वैभवशाली संक्रमण घडविलें. त्याचा ‘ जपुजी ’ म्हणजे सरळ साध्या जीवनाचा आणि आदर्श विचारांचा आरसा आहे.

‘ साधना ’. १२ मे १९५६.

# कबीर

"आमार माझारे जे आछे से गो
कोन विरहिणी नारी ?"—रवीन्द्र

अर्धनारीनटेश्वराची कल्पना ज्याच्या प्रतिभेंतून स्फुरली, तो खास विराट् प्रतिभेचा महाकवि असला पाहिजे. विराटाशी समरस होण्यासाठीं व्याकुळलेली ही विश्वरूपा नारी त्यानें अनुभूतीच्या प्रकाशांत साकार केली अन् त्या मूर्तींत साऱ्या विश्वाचें रहस्य व्यक्त झालें. बृहदारण्यकाच्या द्रष्टयानेंहि आपल्या अन्तःस्फूर्तींतून याच महान् सत्याला शब्दरूप दिलें आहे. तें एकमेवाद्वितीय, आनन्दस्वरूप, विराट् तत्त्व केवळ आत्मक्रीडेसाठीं द्विधा झालें अन् त्या क्षणापासून या अनन्ताच्या पसाऱ्यांत एक कधींहि न संपणारी प्रणयक्रीडा सुरू झाली.

० ० ०

मानवाच्या हृदयांतहि अशीच एक विरहिणी सुप्त असते. तिला जाग आली कीं मानवाचें लौकिक जीवन उद्ध्वस्त होऊं लागतें. 'कादम्बरी'तील विरागिनी महाश्वेतेप्रमाणें हृदयाच्या शिवालयांत ती वीणेचे आर्त सूर छेडूं लागते. विराटाच्या तरल आलोकानें, ओझरत्या स्पर्शानें अन् नटचंचल संकेतानें ती विरहिणी बावरी बनते. तिला लौकिकाचीं बंधनें जाचूं लागतात. घराची कारा बनते. किंबहुना या देहांतील अस्थिचर्मांच्या कुंपणाआड तिचा आत्मा तगमगूं लागतो. विराटाच्या विरहानें व्यथित

होऊं लागलेली ही विरहिणी साऱ्या जीवनव्यापारांविषयीं उदास बनूं लागते; घरींदारीं असून नसल्यासारखी वावरूं लागते. विराटाच्या ध्यासामुळें लौकिकाचा उपेक्षित दुर्वास रुष्ट होऊन आपणांस शापील, याची तिला जाणीवच उरत नाहीं. हरपल्या श्रेयाच्या शोधासाठीं हें सारें संसारजाल तटातट तोडून चालतें व्हावें, असें तिला वाटूं लागतें... पण तिचें सामर्थ्य थिटें पडतें...लौकिकाचा अटळ मोह अन् अलौकिकाचा खुळा ध्यास यांच्या संघर्षांत अनेकदां तिचें हृदय रक्तबंबाळ बनतें...

पण तिचा प्रियसखा उमलत्या फुलांतून हंसूं लागतो. परिमळानें धुंद बनलेल्या वाऱ्याच्या झुळकींतून तिला हलुवार स्पर्श करून जातो. उत्तररात्रींच्या प्रशान्त प्रहरीं नक्षत्रांआडून तिला साद घालतो. विहगांच्या मधुर कंठांतून तिला प्रणयाचें निमंत्रण देतो. प्रभंजनाचीं पैंजणें पायांत घालून वर्षेच्या सहस्र धारांबरोबर उन्मत्त होऊन नाचत राहतो. अन् ऋतुचक्राच्या नाट्यांत बहुरूपांनीं नटून तो तिला 'पर्युत्सुक' बनवतो... अभिसाराचे संकेत करूं लागतो...

आणि मग लौकिकाचीं सारीं बंधनें उखडून, साऱ्या लौकिक विधि-नियमांना पायांखालीं तुडवून एखादी जनी 'येसवा' बनून 'केशवाचं घर' रिघते...एखादी बहिणाबाई परपुरुषाच्या रतीसाठीं अभिसाराला सिद्ध होते....एखादी 'दरदादिवानी' मीरा लौकिकाच्या विषानें काळी-निळी बनलेली असूनहि त्या अलौकिक जोग्याच्या विभूतीसाठीं आपल्या सर्वांगाचं भस्म करायला सिद्ध होते...

० ० ०

कबीराची आत्मविरहिणी याच विरळा जातींतली आहे. सर्व मध्य-युगीन साधकांत कबीराचें स्थान सर्वोच्च आहे. पंधराव्या शतकांतील या काशी-निवासी महापुरुषानें गोरखनाथ आणि रामानंद यांच्या विद्रोहिणी ...मशक्तीचा वारसा घेऊन भारतीय साधनेच्या विश्वांत एक नवें शिल्प

निर्माण केलें. या शिल्पाची जडण-घडण कांहीं न्यारीच आहे. पारम्परिक जड संकेतांना झुगारून, केवळ आत्मसौन्दर्याच्या साक्षात्काराला प्रामाणिकपणें व्यक्त करण्यासाठींच कबीराचा अवतार आहे. त्याची विवेकनिष्ठा अत्यंत धारदार आहे. ही विवेकनिष्ठेची धार त्यानें साऱ्या अन्तर्बाह्य दम्भांवर बेदरकारपणें चालविली आहे. विवेक अन् आत्मानुभूति यांच्याविना त्यानें कुणालाच प्रमाण मानलें नाहीं. आणि म्हणूनच सत्यानें त्याच्या वाणीचें स्वेच्छया अनुसरण केलें. परिवर्तित मुसलमान कुटुंबांत वाढलेल्या हा कोष्टी चरख्यावर सूत कांततांना अन् मागावर धागे विणतांना परमार्थाचीं महावस्त्रें विणण्यांतहि सिद्धहस्त झाला. दिक् अन् काल यांच्या उभ्याआडव्या धाग्यांनीं हें विश्वाचें महावस्त्र विणणारा विणकर त्याला आपल्या व्यवसायांतूनच उमगला. जड-चेतनाच्या स्तम्भांना बांधलेल्या मनाच्या हिंदोळ्यावर बसून कबीरानें अनन्त आकाशांतील त्या अदृष्ट सवंगड्याला पकडलें अन् त्याच्यासह तो हिंदोळूं लागला...

जहँ खेलत बसन्त रितुराज  
जहँ अनहद बाजा बजै बाज  
चहुँदिसि ज्योतिकी बहै धार।  
बिरला जन कोई उतरै पार।

कोटि कृष्ण जहँ जोडे हाथ  
कोटि विष्णु जहँ नावैं माथ  
कोटिन ब्रह्मा पढैं पुरान  
कोटि महेश धरैं जहँ ध्यान।

कोटि सरस्वती जहँ धरै राग  
कोटि इन्द्र जहँ गगन लाग।

० ० ०

अशा परंधामांत त्यानें आपल्या ‘ सांई ’ सह परमसुखाची लयलूट केली. त्या परंधामाचें कबीरानें मोठें हृदयंगम वर्णन केलें आहे :

सखि, वह घर सबसे न्यारा
जहँ पूरन पुरुष हमारा !
जहाँ नहिं सुख–दुख, साँच–झूट नहिं,
पाप न पुन्न पसारा,
नहिं दिन–रैन, चन्द नहिं सूरज
बिना जोति उजियारा !

कबीराच्या आत्मवधूनें हें अपार्थिव सौदर्याचें परमनिधान प्राप्त तरी कसें केलें ? विराटाविषयींच्या तिच्या प्रेमोद्भावाची पार्श्वभूमि तरी काय होती ? तिला हा विराटपुरुष इतका प्यारा कां ? ‘ जिससे रहनि अपार जगतमें, सो प्रीतम मुझे पियारा है ’ असें तिनेंच आपल्या प्रीतीचें उद्भव-कारण स्पष्ट केलें आहे. हा प्रीतीचा मार्ग कांटेरी आहे, याची तिला जाणीव आहे. तहानेनें जीव तडफडत असतांहि मेघांतील जलबिन्दूसाठीं आसुसलेला चातक, व्याधाच्या शरवेधाची पर्वा न करतां संगीतश्रवणांत धुंद होणारा भृग, मृत पतीला अनुसरण्यासाठीं निर्भयपणें अग्निप्रवेश करणारी सती–हे तिचे प्रीतिपथावरचे वाटाडये आहेत. . .

छोडो तन अपने की आसा,
निर्भय ह्वै गुन गाई
कहत कबीर सुन भाइ साधो,
नाहिं तो जनम नसाई

० ० ०

हा दुर्लभ मानवजन्म व्यर्थ दवडण्याची तिची तयारी नाहीं. विराटाच्या महालाला लागलेला भ्रमाचा टाळा प्रीतीच्या चावीनें खोलायचा

असतो, हें तिला मनोमन पटलेलें आहे. म्हणूनच ही आत्मवधू स्वतःलाच निग्रहानें बजावीत आहे :

दुलहिनि, तोहि पियके घर जाना !
काहे रोवो काहे गावो,
काहे करत बहाना ?
काहे पहिऱ्यौ हरि हरि चुरियाँ
पहियौ प्रेमके बाना
कहै कबीर सुनो भाई साधो
बिन पिया नहिं ठिकाना !

प्रीतीची चुनडी नेसून अन् व्यथेचें अंजन लेवून ती प्रियाच्या शोधाला निघाली आहे. तिला रूपमंडनाचा सोस नाहीं—हृदयांत केवळ 'पियामिलनकी आस' आहे. आर्तीचें अंजन ल्यायल्यानें निगूढ अज्ञाताच्या गर्भांतील सौन्दर्यनिधान दिसूं लागतें, अशी तिची श्रद्धा आहे. वेदना—असीम बिरहवेदना हें विराटाच्या मन्दिराचें महाद्वार आहे. प्रियाबरोबर तिला प्रीतीचा सारीपाट खेळायचा आहे—त्या खेळांत आपलें सर्वस्व पणाला लावायचें आहे. कारण आपला जय झाला तर तो आपल्याला मिळेल अन् त्याचा जय झाला तर आपण त्याला मिळूं. . .त्याच्या सहवासाच्या धुंदींत जयापजय, सुखदुःखें यांच्या सीमारेषा विरून जातील....

० ० ०

पण हें कसें शक्य व्हावें ? ही विणकराच्या जातींतली विरहिणी सारा जीवनव्यापारच प्रीतीनें भारून टाकीत आहे. आपल्या सुंदर कायानगरींत चैतन्याच्या महालांत ज्ञानरत्नाच्या पिढ्यावर तिचा चरखा फिरत आहे. प्रेम-भक्तीचें सूत ती कांतीत आहे....दिन-रजनीची माला गुंफीत आहे. पण तरीहि तो 'बेदरदी सांई' अजून दूरच आहे. या विरहिणीची तगमग सारखी वाढत आहे. आपल्या घरांतच तिला 'कैदी' जीवन जगावें लागत

आहे. तिला अन्नपाणी रुचत नाही. निद्रेविना रात्री जागवल्या जात आहेत. म्हणून ती प्रियाला कळवळून विनवीत आहे....

कै हम प्राण तजति है प्यारे,
कै अपनी कर लेव
दास कबीर बिरहा अति बाढै
हमको दरसन देव

ज्याच्यासाठीं घरादाराचा त्याग करून बाहेर पडायचें, लोकलज्जा सोडायची, अन् जनी-वनीं ज्याच्या भेटीसाठीं आतुर होऊन वणवणायचें, त्यानेंच अव्हेर केला तर कुणाला शरण जावें ?—

सब कोई कहै तुम्हारी नारी
मोको लागत लाज रे,
बालम, आवो हमारे गेह रे !

० ० ०

या विनवणीचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेर—

धरती आसन किया
तंबू असमाना,
चोला पहिरा खाकका
रह पाक समाना

अशा अवस्थेंत धरणें धरलें. पण व्यर्थ ! शोधासाठीं रस्ता तुडवतांना भोंवळ येत आहे; पाय वारंवार ठेचकाळत आहेत; वाट पाहून पाहून दृष्टि झांकोळली आहे. आणि नांवाचा एकसारखा पुकारा करून कंठाला शोष पडला आहे.

बिरह कमंडल कर लिये
बैरागी दो नैन
माँगै दरस मधुकरी
छके रहैं दिन-रैन

त्याच्या प्राप्तीसाठीं ही विरहिणी जोगन बनली. हातीं विरहाचा कमंडलु घेऊन केवळ दर्शनाची भिक्षा मागत वणवणूं लागली, तरी रात्रंदिवस त्या हतभागिनीला वंचनेवांचून कसलाच लाभ झाला. नाहीं. अखेर वेदनेनें विव्हळ झालेल्या अवस्थेंत तिनें तनूची तंत्री करून जोगियाचे करुणार्त स्वर छेडले आणि आपल्या हृदयांतील विराट वेदनेच्या धारावृष्टींत त्या असीमाचें हृदय बुडवून टाकलं...

सब रंग तांत रबाब तन,
बिरह बजावै नित्त
और न कोई सुनि सकै,
कै सांई कै चित्त,

या विरहिणीच्या प्रीतिप्रभावानें त्या 'बेदरदी 'ला दया आली. त्याच्या स्नेहदृष्टीच्या वृष्टींत विरहिणीचा दाह शान्त झाला. त्याच्या करुणेच्या मेघांनी सारें आकाश जणूं झांकोळलें आणि एकाएकीं शीतल वर्षाव होऊं लागला...

गगनघटा घहरानी साधो
गगनघटा घहरानी,
पूरब दिससे उठी हैं बदरिया
रिमझिम बरसत पानी !

तिच्या तपाला भुललेला प्रीतम तिच्या घरीं पाहुणा आला; घरादारांत मंगलाचा सडा पडला. तृष्णा तृप्तीचें गीत गाऊं लागली अन् हृदयांतील सारे विकार परमशांतीच लेणं लेवून प्रियाच्या स्वागताचीं गीतें गाऊं लागली. एखाद्या मदिरालयाच्या स्वामिनीनें मोजमाप न करतां मनसोक्त मदिरा प्राशून धुंद व्हावें, तशी तिची अवस्था झाली. आपल्या प्रीतिविजयाची 'अकथ-कहानी' ती कशी सांगणार ? कारण जिथें वाणी मौनावते, अशा परमानंदाच्या सागरांत तिचें मन डुंबत आहे. आतां—

साँइते मिलन भयो जा दिनसे,
सुरत न अन्त चली
आँख न मूँदूँ कान न रूँधूँ,
काया कष्ट न धारूँ,
खुले नैन में हँस हँस देखूँ
सुन्दर रूप निहारूँ.

कारण आतां सकल उच्चारणच्च नामस्मरण बनून गेलें आहे; श्रवणच स्मरण बनलें आहे; सारा क्रियाकलापच्च पूजन बनला आहे; सहज पदप्रक्षेपणच परिक्रमेचें रूप पावलें आहे अन् शयनच दण्डवत् नमन बनलें आहे. ज्याच्या शोधासाठीं देश-विदेश पालथे घातले, त्या प्रियाचें मीलन झाल्यावर आंगणच विदेश बनून गेलें ! प्रेमपत्रांची गरजच संपली. कारण—

आतम दृष्टि कहा लिखै ?
जित देखै तित पीव !

० ० ०

तिनें त्याला डोळ्यांत सामावून घेतलें आहे अन् डोळा मिटून घेतला आहे—हेतु असा कीं—

ना मैं देखूं औरकू
ना तुझ देखन देऊं !

नेत्रांच्या महालांत नेत्रदळांच्या पलंगावर प्रियाला बसवून अन् पलकांचा पडदा टाकून ती प्रियाबरोबर 'सुरति'—सुखाचा अनुभव घेत आहे. त्या अखंड एकरस सामरस्याचें वर्णन ही प्रेमवेडी असें करते——

लाली मेरे लालकी
जित देखूँ तित लाल
लाली देखन मैं गयी
मैं भी हो गयी लाल

मग वेदनेच्या गहराईतून आनन्दाचीं कारंजीं उफाळूं लागतात. आत्मा अनावृत बनून—'घुँघटका पट' दूर सारून परमात्म्याला 'उराउरीं'

भेटतो आणि आनन्दभैरवीच्या स्वरलहरींवर तरंगत त्या विराट संगीतांत वीराम पावतो.

दरियावकी लहर दरियाव है जी,
दरियाव और लहरमें भिन्न कोयम् ?
उठे तो नीर है, बैठे तो नीर है,
कहो दूसरा किस तरह होयम् ?

० ० ०

हें 'सुरतिसुख' 'इंद्रियां नेणतां' भोगण्याची खबरदारी कबीराच्या आत्मवधूनें पुरेपूर घेतली आहे : डोळे जडावले आहेत; फुलांची मृदुल शय्या वाट पहात आहे; ज्योतीभोंवती पतंग तन्मयतेनें झेपावत आहेत; अशा वेळीं ती प्रियाला विनवीत आहे :

ये ऑखिया अलसानी,
पिय सेज चलो !...
धीरे पाँव धरो पलंगापर;
जागत ननद जिटानी ।
कहे कबीर सुनो भाई साधो
लोकलाज बिलछानी ।

त्या गगनमंडलांतल्या नक्षत्रपुष्पांच्या शय्येवर भोगलेलें तें सुरतिसुख ही रमणी व्यक्त तरी कसें करणार ? त्या महामौनांत विसांवलेल्या मनाला शब्दांत कसें बांधतां येणार ? अमृताचा आस्वाद घेतलेल्या मुक्यासारखी या रमणीची अवस्था झाली आहे :

अकथ कहानी प्रेमकी
कछू कही न जाई,
गूँगे केरि सरकरा,
बैठे मुसकाई !

'साधना', १४ डिसेंबर १९५७

# रामदास

तेराव्या शतकापासून सतत पांचशें वर्षे महाराष्ट्रांत ‘ सकळ-मंगळांचा वर्षाव ’ करीत ‘ ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ’ वावरत होती. त्यांच्या पावन स्पर्शानें महाराष्ट्राचें अन्तर्बाह्य जीवन अनुप्राणित झालें होतें. त्यांच्या वाणींतून ‘ ईश्वराचें मनोगत ’ व्यक्त होत होतें आणि करणींतून मानवी जीवनाचें परमध्येय साकारत होतें. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास या महाराष्ट्राच्या आध्यात्मिक पंचायतनानें महाराष्ट्राचें आत्मिक वैभव शिगेस पोंचविलें. या पंचायतनानेंच महाराष्ट्रांतील जनमानसांत जीवनाचा एक उच्चत्तम मानदंड निर्माण केला; पूर्ण जीवनाची ज्वलन्त लालसा निर्माण केली आणि चिरन्तन जीवनमूल्यांच्या उपासनेचा मार्ग दाखविला. या पंचायतनांतील अखेरचे महापुरुष श्रीसमर्थ रामदास यांचें जीवन आणि कार्य महाराष्ट्रीय सन्तमण्डळांत अनेक दृष्टींनीं आगळें आहे.

० ० ०

शिव छत्रपतींच्या स्वराज्य-संस्थापनेच्या कार्याला वैचारिक अधिष्ठान देणारे आणि जनसंघटनासाठीं सतत संचार करणारे एक ‘ राजकारणी संत ’ असें श्रीसमर्थांचें वर्णन केलें जातें. स्वतः प्रपंचपराङ्मुख होऊन अनेकांचा प्रपंच ‘ नेटका ’ करण्यासाठीं त्यांनीं मराठी लोकजीवनाचें सूक्ष्म निरीक्षण व विश्लेषण केलें आणि परमार्थोन्मुख प्रपंचविज्ञानाचें सविस्तर विवरण केलें. आजवर समर्थांच्या व्यक्तिमत्त्वाचें अन् जीवनकार्याचें जें

मूल्यमापन झालें आहे, त्याचें स्वरूप असें आहे. त्यांत भावुकतेला, हळव्या करुणेला, सौंदर्यवेधी संवेदनेला स्थान नाहीं; अनुभूत सत्यावर आधारलेले तर्कनिष्ठ विचार आणि शुद्ध विवेकाधिष्ठित आचार यांनाच त्यांच्या जीवन-क्रमांत स्थान होतें. या एकांतिक मूल्यमापनामुळें समर्थ सर्व भारतीय संत-मण्डळांत 'वेगळे' वाटतात; त्यांच्या 'सन्त'–पणाला मर्यादा आहेत, असें वाटूं लागतें. अनेक टीकाकारांनीं दूषित दृष्टीनें समर्थांना 'पुरोहितशाहीचे पुरस्कर्ते' ठरवून विसाव्या शतकांतील जातीयवादाच्या रंगणांत खेचलें आहे.

० ० ०

समर्थांचें 'राजकारण' ही त्यांच्या काळांतील एक अटळ ऐतिहासिक गरज होती. तें समर्थांच्या जीवनाचें एक कालसापेक्ष अंग आहे—त्यांचें जीवनसर्वस्व नव्हे. दलित आणि पीडित मानवतेच्या व्यथेनें व्यथित होणें, अन्याय, विषमता आणि अज्ञान यांच्या चक्रांत पिचून-पिळून निघणाऱ्या दीन जनांच्या हृदयांतील सुप्त मानवाला जाग आणणें आणि शाश्वत जीवन-मूल्यांच्या उपासनेचा आदर्श आपल्या सहज आचारांतून निर्माण करणें हें सर्वच संतांचें जीवनकार्य ठरतें. त्यांत कालसापेक्ष आणि व्यक्तित्वसापेक्ष असें थोडें निराळेपण, क्वचित् मर्यादाहि जाणवतील, हें निश्चित; पण 'कालसापेक्ष' आणि 'कालातीत' यांचा विवेक सुटून समर्थ संकुचित वर्गीय भावनेच्या आहारीं गेले होते असें मानणें, हें शुद्ध अज्ञान आहे.

० ० ०

जयाचिये प्रतीतीचा बाखारा—
माजीं पखाडु होय चराचरा
तो महात्मा धनुर्धरा
दुर्लभु आथी ॥

या 'दुर्लभ' जातींतच समर्थांचा निःशंकपणें समावेश करावा लागेल.

येऱ्हवीं बहुत जोडती किरीटी
जयांचीं भजनें भोगासाठीं
जे आशातिमिरें दृष्टी—
मंद जाले ॥

या सवंग जातीच्या गुणांचा स्पर्श अंशतःहि समर्थांच्या व्यक्तिमत्त्वाला झालेला नव्हता. लहानपणीं ' विश्वाची चिंता ' करीत बसणाऱ्या असामान्य बालकांतून रामदासांचें ' समर्थ ' व्यक्तिमत्त्व परिणत झालें आहे. त्याचें अधिष्ठान वैश्विक करुणेचें आहे. करुणेच्या अणूंतूनच त्यांच्या अस्मितेनें ब्रह्माण्डाला गवसणी घालण्याइतकें व्यापकपण मिळविलें. सारा संकुचितपणा टाकून ' ब्रह्माण्डाचें आपोशण ' घेऊं पहाणाऱ्या तुकारामाप्रमाणेंच समर्थांनींहि कृपणपणाचा निषेध केला आहे; भव्यतेची ओढ घेतली आहे—

कृपणपण नसावें भव्य लोकीं दिसावें,
अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें !

हें ' करुणेचें चिन्ह 'च समर्थांच्या जीवनाचा गाभा आहे. त्यांतूनच ' अवघा हलकल्लोळ ' करण्याची आटाआटी निर्माण झाली आहे. त्यांतूनच साऱ्या ' चळवळीं 'ची उभारणी झाली आहे आणि त्यांतूनच त्यांच्या ' राजकारणा 'चा पसारा वाढला आहे. समर्थांच्या जीवनांतील एवढ्या विराट् कर्मांची प्रेरणा या करुणेंतच आहे. याच करुणेच्या स्फुल्लिंगांतून त्यांनीं आपल्या जीवनवेदीवर एक धगधगतें होमकुंड चेतवलें आणि त्या प्रज्वलित होमाग्नींतून शुभंकर शक्तीचा उदय झाला. ' कर्मीं भर होआवा निराशाही ' या सूत्रानुसारच त्यांनीं लोकसंग्रहासाठीं, बुडत्या जनांना तारण्यासाठीं कर्मांचा पसारा निर्माण केला. सन्तांच्या जीवनांत विरागच अनुरागाला जन्म देतो आणि निवृत्तीच प्रवृत्तीची प्रेरणा बनते. त्यांची प्रवृत्ति म्हणजे असीम करुणेची अभिव्यक्ति असते.

समर्थांच्या प्रवृत्तीचा ध्रुवतारा कोणता होता, हें त्यांच्या वाणींत अनेक ठिकाणीं स्पष्ट झालें आहे. समताधिष्ठित शासनमुक्त समाजाचें चित्र त्यांच्या दृष्टीसमोर तरळत होतें. त्यांना जें ' रामराज्य ' हवें होतें, तें त्यांच्याच शब्दांत पहावयास हवें—

उद्वेग पाहतां नाहीं चिंता मात्र नसे जनीं
व्याधी नाहिं रोग नाहीं लोक आरोग्य नांदती ॥
युद्ध नाहींच अयोध्या राग ना मत्सरु नसे ।
बंध निर्बंधही नाही दंड दोष कदा नसे ॥
बोलणें सत्य न्यायाचें अन्याय सहसा नसे ।
अनेक वर्तती काया येक जीव परस्परें ॥
दरिद्र धुंडितां नाहीं मूर्ख हा तो असेचिना ।
परोपकार तो मोठा सर्वत्र लोकसंग्रहो ॥
अद्भुत पिकती भूमी वृक्ष देती सदा फळें ।
अखंड दुभती धेनु आरोग्यें वाहतीं जळें ॥
नद्या सरोवरें बावी डोलतीं नूतनें बनें ।
फळतीं फुलतीं झाडें सुगंध वनवाटिका ॥
चढता वाढता प्रेमा सुखानंद उचंबळे ।
संतोष समस्तां लोकां रामराज्य भूमंडळीं ॥

या रामराज्याच्या स्वप्नरंजनांत समता, समृद्धि आणि स्वयंशासन या तत्त्वत्रयीचा अन्तर्भाव चिंतनीय आहे. या स्वप्नचित्रणांत समर्थ गंधमय वनश्रीला विसरत नाहींत, हेंहि ध्यानांत घ्यावयास हवें.

० ० ०

समर्थांनीं राघवाच्या पदांचा छंद धरला तोहि विश्वोद्धारासाठींच. ' राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ॥ ' असाच त्यांचा दृढ निश्चय होता. या निश्चयाचें फळ ' राम जनीं राम वनीं । रामरूप

हे अवनी ' या वैश्विक अनुभूतीच्या रूपानें मिळाल्यावर विश्वोद्धार हीच रामोपासना बनली—

भेटो कोणी एक नर
धेड महार चांभार
त्याचें राखावें अन्तर
या नांव भजन !

ही त्यांची भक्तीची व्याख्या आहे आणि स्वाभाविकच त्यांचा ' भक्तराजा 'चा आदर्श—

श्रेष्ठ जो तोचि जाणावा
बहुतां मानतां मनीं ।
सकाळांसी मिळों जाणे
बहुतांसी बहुतांपरी ॥
तोचि तो अंश देवाचा
मिळाला जगदांतरें ।
नैराश तापसी ज्ञानी
सर्वांसी पाहिजे सदा ॥

असा सर्वांना हवा-हवासा वाटणारा आहे. जगदांतरासी एकात्मता साधूं पाहणारा महामानव हाच समर्थांच्या ध्येयाचा ध्रुवतारा आहे.

० ० ०

अभिमान नावडे
धांवती दीनांकडे ।
तयांचे जे उकरडे
महाल त्यांचे ॥

हा दीनांविषयींचा अपार कळवळा, दीनांच्या घरांतील उकिरड्याला महाल मानण्याची ही करुणात्मता समर्थांच्या हृदयांत शिगोशिग ओसंडत

होती. विवेकाला त्यांच्या आचारविचारांत प्राधान्य होतें; पण त्यांचा विवेक रुक्ष नव्हता, केवळ तर्कटी नव्हता. त्या विवेकाचा ' देवाशीं योग ' झालेला होता. त्याचमुळें—

पोहोणारें बुडते तारावे ।
सामर्थ्यें बुडों नेदावे ।
मूर्ख ते शहाणे करावे ।
विवेकी पुरुषें ।।

ही बुडत्याला तारण्याची धडपड त्यांच्यांतील ' विवेकी पुरुष ' करीत होता.

० ० ०

समर्थांची सौंदर्यभावना अत्यन्त उत्कट होती. दऱ्यादरकुटांतून आणि निबिड अरण्यांतून भ्रमण करण्यांत त्यांनीं आपल्या जीवनांतील बराच काल व्यतीत केला. हें भ्रमण सौंदर्यपराङ्मुख विरक्ताचें नव्हतें, सौंदर्यासक्त रसिकाचें होतें.

जयासी वाटे वैराग्य करावें
तेणें कांहींच न विचारावें
उठोनि वाटाचि लागावें
दिगंतराप्रती ।।

वैराग्य-साधनेसाठीं समर्थांनीं दिगंतरभ्रमणाचा उपाय सांगितला आहे. परंतु समर्थांच्या बाबतींत विराग म्हणजे सौंदर्यपराङ्मुख, भावनाशून्य रुक्षता नव्हे—विराग म्हणजे विशेषानुराग, चराचराविषयींचा अनुराग. विराग म्हणजे सर्व स्थिरचरांत एकाच परम सौंदर्यतत्त्वाचें दर्शन घेऊं पाहणारी दृष्टि. याच उच्चतम सौंदर्यतत्त्वाचा वेध घेत, स्थिरचरांतील ' रामा 'चा शोध घेत समर्थ वणवण भटकले आणि आसुसलेल्या मनानें त्यांनीं त्या ' रामा 'ची लयलूट केली. वृक्षवल्लरींच्या सान्निध्यांत, झरत्या निर्झरांच्या खळखळाटांत, कोंवळ्या पांखरांच्या किलबिलाटांत समर्थ

वेडावून जात आणि फुलांच्या परिमळाचा आस्वाद घेत घेत ते पर्वतांच्या घळींत बसून शास्वत मूल्यांचें चिंतन करीत.

शाश्वताची प्रीति विषयीं विरक्ति ।
स्वरूपीं आसक्ति याचें नांव भक्ति ॥

ही त्यांची भक्तीची कल्पना त्यांच्या सौंदर्यभावनेशीं सुसंगतच आहे.

पर्वतीं उदकापासीं सन्निधचि येकीकडे ।
फार येकांत सेवावा अभ्यास नित्यनूतनु ॥
साहावीं सीतउष्णादि पाहावीं रम्यसीं स्थळें ।
करावे आपण कष्ट बांधावीं तें हळूहळू ॥

असें त्यांनीं आपल्या भ्रमन्तीचें उद्दिष्ट विशद केलें आहे. या रम्य स्थळांच्या दर्शनानें समर्थांच्या हृदयांतील ' गायनी कळा ' जागृत होई आणि त्या संगीतलहरींवर तरंगत समर्थांचा अपार्थिव आत्मा आत्मारामाशीं समरसून जाई !

० ० ०

समर्थांच्या जीवनांत आपणांस तुकारामाप्रमाणें नित्य असा ' युद्धाचा प्रसंग ' आढळत नाहीं. शैशवापासून त्यांच्या आत्म्याला परमात्म्याची ओढ लागलेली दिसून येते. जन्मान्तर-साधनेचा वारसा घेऊनच ते या जगांत अवतीर्ण झाले असावे, असें वाटतें. साधनेच्या प्रारंभांतील कांहीं काळ त्यांना मनाला ' अंकुश ' लावावा लागला; आवरलें तरी भटकणारें ' अचपळ मन ' त्यांना साधनेंतून मागें खेचीत होतें. पण ही ओढाताण फार काळ टिकली नाहीं. या निश्चयाच्या महामेरूनें मोहांचें दमन केलें आणि आपल्या साऱ्या चित्तवृत्ति जीवनांतील रामाच्या शोधाकडे केंद्रित केल्या. मग ज्ञानेशांप्रमाणेंच त्यांच्या सर्वेंद्रियांच्या अंगणांत विवेकाची ' राबणी ' सुरू झाली आणि त्यांच्या जीवनांत ' राम ' संचारूं लागला. हा रामच त्यांच्याकरवीं ' रामराज्या 'ची मांडणी आणि संपादणी करीत होता.

' साधना ', २३ फेब्रुवारी १९५७

# तुकाराम

तुझ्या वाणीचा पहिला स्पर्श जेव्हां माझ्या कानामनाला झाला, तेव्हां मी अगदीं लहान होतों. पहाडांच्या कुशींत विसावलेलें माझें गांव— तिथें मारुतीच्या मंदिरांत रात्रीं भजनाला रंग चढूं लागला कीं, तुझ्या नांवाच्या मुद्रेनें मढवलेले अभंग दऱ्याखोऱ्यांत घुमूं लागत आणि क्षणभर आकाशहि नक्षत्रांच्या डोळ्यांतून दंवाचे आनंदाश्रु वाहवूं लागे. अशा वेळीं मी दूर खांबाआड बसून राही आणि स्वतःला विसरून त्या भजनरंगांत रंगून जाई. मला कंठ नव्हता, पण कान होते आणि रक्ताळलेलें मनहि होतें. या पानाफुलांच्या, जळ-वायूच्या, नक्षत्रांच्या आणि चंद्रसूर्यांच्या जगांत— या धरतीच्या धुळींत पहिलें पाऊल टाकल्यापासूनच मी वेदनेचा वारसा सांभाळीत होतों. मन प्रतिक्षणीं भयानें कंप पावत होतें— अळवाच्या पानावर डळमळणाऱ्या दंवबिंदूसारखें डळमळत होतें. त्या मनाला तुझ्या वाणींत अभयाचें आश्वासन मिळत होतें.

त्या वेळीं माझ्या मनाला कांहीं तरी जाणवायचें——पण आकळायचें नाहीं. तुझे अभंग ऐकतांना तुझें सारें जीवन आंतल्या डोळ्यांपुढें तरळूं लागायचें आणि मन स्वतःशींच म्हणायचें, " तुकाराम हा तुझ्यासारखाच विकल्प-विकारांनीं ग्रासलेला, व्यथावेदनांनीं संत्रस्त झालेला आणि नियतीनें नाडलेला प्राणी होता. "

त्या वेळीं माझा असा खुळा समज होता कीं, देवाच्या नांवानें टाहो फोडला कीं, देव प्रसन्न होतो आणि जीवनांतलीं सारीं दुःखें, किरणांत विरणाऱ्या धुक्याप्रमाणें, नाहींशीं होतात. अस्थींच्या ज्वाळांनीं लिहिलेल्या तुझ्या अभंगांतील दाहकता त्या वेळीं मला कळूं शकत नव्हती. एक व्रणविरोपण म्हणूनच मी तुझ्या वाणीकडे पाहत होतों.

० ० ०

परंतु आतां मला कळून चुकलें आहे कीं, तें व्रणविरोपण नाहीं. पोळलेल्या मनाला शीतलता लाभण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं—त्यांत तेजासारखी दाहकता आहे. त्या आगींत—त्या यज्ञज्वाळांत अस्थींच्या समिधा आणि रक्ताची घृतधारा सोडण्याचें मनःसामर्थ्य ज्याच्याजवळ आहे, त्यालाच तुझ्या पायांना स्पर्श करण्याचा अधिकार आहे. तुझ्या चरणांचा मागोवा घेणें सोपें नाहीं. तुझ्या मनाच्या गर्तींत अनंताची वाटहि थिटी पडली, याची मला जाणीव आहे. तुला प्रकाशाचें वेड होतें, परंतु अमावास्येच्या अंधाराचें काळकूट उरीं रिचवण्याचें सामर्थ्यहि तुझ्याजवळ होतें.

तूं जीवनभर सामान्य माणसासारखा वागलास. आम्ही तुला 'भोळा' समजतों. मोकळ्या बंदांची बाराबंदी घातलेलें आणि माथ्यावर पागोटें गुंडाळलेलें तुझें मनोमय ध्यान आम्ही चितारतों. अस्थि-चर्माच्या अन् रक्तामांसाच्या माणसाविषयीं तुझ्या मनांत सहानुकंपा आहे. नसांत नांदणाऱ्या बकासुराशीं तुझीच चांगली ओळख आहे. मेंदूच्या अन् मनगटाच्या मर्यादा तूं चांगल्या जाणतोस—परंतु तूं मनाचा राजा आहेस. तूं मनाच्या अंजुळींतून ब्रह्मांडाचें आपोशण घेणारा अगस्ति आहेस. साडेतीन हात देहांत नांदणाऱ्या तुझ्या आत्माला क्षितिजें नाहींत. आणि त्याचमुळें तूं अवकाशाच्या काळ्या-निळ्या पृष्ठावर नक्षत्रांची अभंगगाथा लिहूं शकलास.

० ० ०

"आज जेव्हां हें सर्व जाणवतें, तेव्हां मनाला इंद्रायणीची ओढ वाटूं लागते. जिथल्या जळ-मातीनें तुझ्या अनन्त आत्म्यासाठीं इवलासा प्राकार उभारला, त्या भूमीची ओढ वाटूं लागते. परंतु रोजची जगण्याची धडपड चालू असते. त्या धडपडींत, त्या विकल आणि विफल खटाटोपांत ती ओढ जिरून जाते. आम्ही जगतों—जिवंत असतों म्हणून जगतों. आम्हांला जीवनाविषयीं उत्कट रतिहि नाहीं आणि विरतिहि नाहीं. पाप-पुण्याच्या, भल्या-बुऱ्याच्या नि सत्या-असत्याच्या संभ्रमानें आमच्या मनाला करंटेपण आलें आहे. महाव्याधीनें बधिरलेल्या, सडूं-झडूं लागलेल्या गात्रांसारखी आमची जीवनविषयींची आसक्ति बधिर झाली आहे. भुकेनें वखवखलेल्या कुत्र्यांप्रमाणें आमचीं मनें सडलेल्या वासनांचीं हाडें चघळीत असतात. अशा अवस्थेंत कुणीतरी मनाच्या अंतर्भागांतून हांक देतें—

देहूसी जाऊनी देह विसरावा।
अंतरीं स्मरावा तुकाराम॥

ही हांक ऐकून मन पुन्हां शंकाकुल होतें. देहांत राहून देह विसरणें शक्य आहे काय? परंतु तुझ्या विश्वाकार अनुभूति पाहून शंका विरते आणि मन उगाचच हुरहुरूं लागते.... गगनाचें घरटें करण्यासाठीं धडपडूं लागतें. त्याच्या त्या धडपडीला यश येत नाहीं. पंख झडलेल्या पांखरासारखी त्याची गति रुद्ध होते. आसावलेले डोळे क्षितिजान्ताच्या पलीकडे एकटक पाहत राहतात आणि अखेर क्षणभरानें अश्रुकुंडांतून झिरपणाऱ्या खाऱ्या पाण्यांत ते बुडून जातात.

० ० ०

तुझ्या मनाच्या शक्ति कल्पनातीत आहेत. तूं प्रत्यक्ष परमात्म्या-सहि विवेकाच्या मुठींत जाळलेंस आणि संभ्रान्तीचें हिणकस दूर सारून तो सोन्याचा गोळा लीलया तळहातावर ठेवून तूं निरखीत राहिलास—

जनीं जनार्दन ऐकतों हे मात ।
कैसा तो वृत्तांत न कळे आम्हां ।।

जन्म जरा मरण कवण भोगी भोग ।
व्याधि नाना रोग सुख दुःखें ।।

पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें ।
हीं कोणाकारणें कवणें केलीं ।।

आम्हां मरण नाश तूं तव अविनाश ।
कैसा हा विश्वास साच मानूं ।।

तुका म्हणे तूंचि निवडी हा गुढार ।
दाखवी साचार तूंचि मज ।।

हे तुझे प्रश्न ऐकून प्रत्यक्ष परमात्माहि भयग्रस्त झाला असेल—कदाचित् अपराधाच्या जाणिवेनें तो तुझ्यापासून लपून राहिला असेल. परंतु तूं असा–तसा नव्हतास. विवेकाच्या नि सत्यशोधनाच्या न्यायासनासमोर तूं त्याला खेचलेंस आणि त्याच्या अपराधाचें शासन म्हणून त्याला विवेक-निष्ठांचा दास बनविलेंस.

साधनेच्या पहिल्या वाटचालींत तूं विकारांचा मारा खूप सहन केला आहे. दुर्निवार मनाला आवरतां आवरतां तुझें श्वसन जणुं रुद्ध होऊन गेलें होतें. ‘ आपुलेंचि मन । करवी आपणां बंधन ’ असा अनुभव तूं प्रदीर्घ काळ घेतला आहेस. परंतु शेवटीं तूं उन्मनावस्था प्राप्त केलीस आणि ‘ याचि देहीं याचि डोळां ’ मुक्तीचा सोहळा अनुभवलास. दांभिकांच्या दिशाभुलीला तूं आपलें मन बळी पडूं दिलें नाहींस. मनाला विवेकाचा नित्य अंकुश लावलास आणि नित्य नवा जागृतीचा प्रकाश अनुभवलास. या अनुभूतीच्या प्रकाशांत तुझें अंतर्बाह्य जीवन उजळून निघालें आणि—

न कळे दिवस-राती । अखंड लागलीसे ज्योति ॥

असें जीवन प्रकाशानें ओतप्रोत झालें.

० ० ०

तुझें वैकुंठ या जगाच्या पल्याड नव्हतें––चंद्रभागेच्या कांठींहि नव्हतें. तें होतें इंद्रायणीच्या कांठीं.... तुझ्या कायेच्या कक्षेंत नांदणाऱ्या आत्म्याच्या गाभ्यांत. तें वैकुंठाचें पवाडपण तूं सदेह अनुभवलेंस. या अवस्थेची कल्पनाहि आम्ही करूं शकत नाहीं. आणि त्याचमुळें अद्‌भुतांत रमणारें आमचें मन तुला पर-लोकाचा प्रवासी बनवतें. वृक्षवेलींशीं 'सोयरीक' करणारें तुझें हृदय या जगाचा तिरस्कार करील तरी कसें? प्रभूच्या करुणेप्रमाणें नित्य वाहणारी इंद्रायणी, जीवनाचा जयघोष करणाऱ्या हंसऱ्या वनराजि, चैतन्याचा गर्भ पोसणारी मायाळू धरणी, करंटेपण दवडणारें असीम आकाश आणि आत्म्याचें तपोवन बनलेला तुझा देह—या साऱ्यांविषयीं तुझ्या मनांत निःसंशय प्रीति वसत असणार !

तुला व्यवहारी जगाचे व्यवहार कळत नव्हते....तें व्यवहारचातुर्य तुला नकोसें वाटत होतें. तूं खराखुरा दिवाळखोर होतास! घेणें तुला माहीतच नाहीं—तूं सदैव देत राहिलास. तूं इंद्रायणीच्या कांठीं प्रीतीची पेठ वसवलीस आणि आल्यागेल्या सर्वांना तूं मुक्तहस्तांनीं तुझें धन देऊं केलेंस. ज्यांच्या ओंजळींना गळती नव्हती, असे फार थोडे होते. तूं दिलेंस, पण तें सांभाळण्याचें, वाढवण्याचें बळ कुणाजवळ होतें? सर्वांना वाटत होतें, तुकोबा भोळा—आम्ही मात्र चतुर. परंतु वस्तुस्थिति निराळीच होती. मनाच्या पिशाचाची शेंडी तुझ्या हातीं होती––त्यामुळें तूं कुबेर बनला होतास. तुझ्या दारीं कामधेनु दुभत होती; तुझ्या आंगणांत आपोदेवी स्वयंस्फूर्तीनें संमार्जन करीत होती; आणि क्षितिजें झांकोळूं लागल्यावर तेजस्तत्त्व तुझ्या दारच्या वृन्दावनांत नित्य ज्योत फुलवीत होतें.

० ० ०

तूं नित्यमुक्त बनला होतास. मदमत्सरांचे नि कामक्रोधाचे बंध तूं उखडून टाकले होतेस. त्यामुळें तुला शत्रु कसा तो ठाऊक नव्हता. तुझ्या स्पर्शानें मातीचें सोनें होत असे, पाषाणांतून रत्नकीळ फुलत असे, विषाचें अमृत बनत असे. या किमयेचें रहस्य तूंच एका अभंगांत सांगितलें आहेस—

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती ।
व्याघ्र हे न खाती सर्प तया ॥
विष तें अमृत आघात तें हित ।
अकर्तव्य नीत होय त्यासी ॥
दुःख तें देईल सर्व सुख फळ ।
होतील शीतळ अग्निज्वाळा ॥
आवडेल जीवां जीवाचिये परी ।
सकळां अंतरीं एक भाव ॥

या किमयेमुळेंच तूं भोगाची समाधि बांधलीस आणि स्वहस्तें मृत्यूची उत्तरक्रिया साजरी केलीस. या किमयेमुळेंच तूं अक्षरांचा स्रष्टा बनलास आणि अभंगगाथा निर्माण केलीस. तुझ्या अभंगांचा ध्वनि कानीं आला कीं मनाला मोह होतो. सिद्धि प्राप्त झालेली नसतांनाच प्रसिद्धीची लालसा निर्माण होते आणि मी खुळेपणानें पांढऱ्यावर काळें करूं लागतों. परंतु भग्न व्यंजनांनीं अक्षरें कशीं निर्माण होणार ? आणि अक्षरांच्या सिद्धीविना अभंग तरी कसा निर्माण होणार ? अशा प्रयत्नांत संपूर्ण अपयश ठरलेलेंच आहे. अपयशानें विव्हळ झालेलें माझें मन तुला उद्देशून आक्रोशूं लागतें—

कधीं लागेल गा नख तुझें माझिया गळ्याला ?
आणि सामर्थ्याचा स्वर माझिया गा व्यंजनाला ?

० ० ०

तुझ्या चरित्रांतील तो प्रसंग मला नेहमीं आठवतो. परतत्त्वाच्या स्पर्शानें पावन झालेली, मानवतेविषयींच्या करुणेनें ओथंबलेली आणि दुरिताचें तिमिर नाहींसें करणारी तुझी तेजस्विनी वाणी तूं स्वहस्तें इंद्रायणींत बुडविलीस. या तुझ्या कृत्यानें तथाकथित धर्मरक्षकांना संतोष झाला. तूं इंद्रायणीच्या तीरावर धरणें धरलेंस आणि हृदय पिळवटून परमात्म्याला हांक दिलीस—

पाषाणाची खोळ घेऊन बैसलासी,
काय हृषीकेशी झालें तुज ?
तुजवरी आतां प्राण मी त्यजीन,
हत्या मी घालीन पांडुरंगा !

हा आक्रोश जणुं पांडुरंगाच्या कानीं गेला. पाषाणाची खोळ टाकून तो चैतन्यघन जणुं सहस्रावधि जनांच्या हृदयांत अवतरला आणि स्वमुखानें तुझ्या अभंगवाणीचा उद्‌घोष करूं लागला. ज्या इंद्रायणींत वह्या बुडविल्या होत्या, त्याच पवित्र सरितेच्या तरंगांवर तुझी अमृतवाणी तरंगूं लागली. अणुरेणूला जिभा फुटल्या आणि विशाल आकाशाच्या कानांत त्या अभंगांचा विराट् निनाद घुमूं लागला.

कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥
वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥

अशी तुझी याविषयींची साक्ष आहे. हा तुझ्या अक्षरांच्या सामर्थ्याचा विराट् प्रत्यय आहे.

हें सर्व आठवतें आणि मी इंद्रायणीच्या ओढीनें अस्वस्थ होतों. वाटतें, तिच्या जळराशींत अजूनहि तो अभंगस्पर्श जागता असेल... ' धन्य आम्ही, तुका देखियला ' असें गौरवानें सांगणारे वृक्ष अजूनहि तिच्या तीरावर उभे असतील....तेथील अणुरेणूंत तुझ्या पदस्पर्शाची उष्ण संवेदना अजूनहि थरथरत असेल.

' साधना ', दिवाळी अंक १९५८

# बहिणाबाई

विवेकनिष्ठा हा एक शाप आहे. तो ज्याच्या भाळीं लिहिला जातो, त्याला नीलकंठाप्रमाणें ' हलाहल ' प्यावें लागतें, श्रीकृष्णाप्रमाणें ' कुरुक्षेत्र ' लढवावें लागतें, येशू खिस्ताप्रमाणें ' क्रूसा ' वर चढावें लागतें, तुकारामाप्रमाणें नित्य ' अंतर्बाह्य युद्धा 'चा प्रसंग अनुभवावा लागतो आणि आगरकरांप्रमाणें आपलीच ' प्रेतयात्रा ' आपल्या डोळ्यांनीं पहावी लागते.

विवेकाची ज्योत अंतरांत फुलवावी आणि तिच्या दाहकतेनें नसांतील रक्त शुष्क व्हावें, अस्थींचा भडका उडावा, बुबुळें करपून जावीं आणि पाहतां पाहतां उभारलेल्या संसाराची राखरांगोळी व्हावी, असा नको-नकोसा वाटणारा अनुभव कितीकांचा आहे. पांच हजार वर्षांपूर्वी मृत्यूचा शोध घ्यायला निघालेल्या नचिकेत्यापासून तों काल-परवां हृदयांतून प्रभूची प्रार्थना उमलत-फुलत असतांना छातीवर गोळ्या झेलणाऱ्या महात्म्यापर्यंत !

आणि तरीहि जगांतलीं शहाणीं माणसें विवेकाची कास धरतात. कारण विवेकामुळेंच प्राण्याच्या प्राणांची प्रतिष्ठा सिद्ध होते, असा साऱ्यांचा अनुभव आहे. विवेक हें जीवनांतील श्रेयाचें महाद्वार आहे. विवेक, विराग आणि विमुक्ति हीं ' समग्र ' जीवनाचें भूमिदान मागणाऱ्या वामनाचीं तीन पावलें आहेत: लौकिकांत अलौकिकाचा, सीमेंत असीमाचा, देहांत विदेहाचा

आणि मनांतच उन्मनीचा अनुभव प्राप्त करून घेण्यासाठीं विवेकाइतकें समर्थ साधन दुसरें नाहीं.

० ० ०

ही विवेकाची ज्योत तीन शतकांपूर्वी एका अजाण मुलीच्या हृदयांत पेटली आणि आश्चर्य म्हणजे एकदां पेटलेली ती ज्योत तिनें पांच तपांएवढ्या जीवनकालांत विझूं दिली नाहीं. तिनें त्या भडकत्या ज्योतीला अखंड तेवती ठेवण्यासाठीं आपल्या रक्ताचें तेल पुरविलें आणि क्रमाक्रमानें कापराप्रमाणें विरणारें, अपार्थिव बनणारें जीवन त्या ज्योतीच्या प्रकाशांत विलीन केलें. त्या मुलीचें नांव बहिणाबाई. इ. स. १६२८ मध्यें वेरूळजवळच्या देवगांवीं एका ब्राह्मण कुटुंबांत तिचा जन्म झाला. ती चार-पांच वर्षांची असतांना तिचें शिऊरच्या एका तीस वर्षांच्या बिजवराशीं लग्न झालें! ज्या वयांत लुटुपुटीचा संसार मांडण्याचेंहि ज्ञान नसतें, त्या वयांत ती 'संसारी' बनली. लग्न होऊन तीन वर्षें लोटतात न लोटतात तोंच भाऊबंदकीच्या प्रकरणावरून तिचे वडील आऊजी कुलकर्णी संकटांत सांपडले. त्यांनीं त्या प्रसंगीं आपल्या जांवयास—रत्नाकर पाठकास बोलावून घेतलें. परिस्थिति आटोक्यांत येण्यासारखी नाहीं, असें पाहून रत्नाकर पाठकानें आपल्या सासू-सासऱ्यांना बरोबर घेतलें आणि कोणताच निश्चित मार्ग समोर नसतांना घरदार सोडून त्यांनीं भ्रमन्ती सुरू केली.

या वेळीं बहिणाबाई केवळ आठ-नऊ वर्षांची होती. सर्वांगीं फुलूं लागण्याच्या क्षणींच जीवनाची पड-झड सुरू झाली. प्रवरा संगम—नीरा-नरसिंगपूर—पंढरपूर—शिखरशिंगणापूर असा त्यांचा निर्हेतुक प्रवास सुरू झाला. समाजाचें दातृत्व हेंच निर्वाहाचें साधन. अशा अवस्थेंत हें प्रवासी बिऱ्हाड कोल्हापुरास आलें. तेथें हिरंभट नामक एका ब्राह्मणाच्या ओसरीवर त्यांनीं वसति केली. रत्नाकर पाठकानें तेथें भिक्षुकी आणि ज्योतिषी

वृत्ति सुरू केली आणि या कुटुंबास कांहींसें ‘ अस्थिर स्थैर्य ’ प्राप्त झालें.

परंतु या स्थैर्याला सुरुंग लावणारी ‘ संकटें ’हि धांवत आलीं. कोल्हापुरांत जयरामस्वामी वडगांवकरांचीं कीर्तनें सुरू झालीं. अकरा वर्षांची बहिणाबाई नित्य कीर्तनाला जाऊं लागली. संकटकाळांतील प्रवासांत पंढरपुरांत अनुभवलेले कांहीं वेगळे क्षण जागे होऊं लागले. त्या क्षणांच्या स्मृतींनीं मनाचें स्थैर्य बिघडूं लागलें. तिथें ऐकलेल्या तुकोबांच्या अभंगांचा गंध इथें कोल्हापुरांत असतांनाहि अस्वस्थ करूं लागला. कीर्तनासाठीं उभी असलेली जयरामस्वामींची सन्मूर्ति तुकोबांचें स्मरण घडवूं लागली आणि आपण ‘ माणसांत असूनहि माणसांतून उठल्यासारखा ’ विलक्षण अनुभव बहिणाबाईला जाणवूं लागला. या मनाच्या एकाकीपणांत तिला जगावेगळी सोबतहि मिळाली. हिरंभटाला दान मिळालेली एक सवत्स धेनु त्यानें देवी संदेशानुसार आपल्या घरीं उतरलेल्या रत्नाकर पाठकास देऊन टाकली. त्या गाईच्या वासराला बहिणाबाईचा लळा लागला आणि तें वेडें वासरूं आपल्या आईला टाकून बहिणाबाईबरोबर घरींदारीं साथ करूं लागलें. दहा-बारा वर्षांची बहिणाबाई त्याची आई बनली. कीर्तनाच्या वेळींहि तें तिचा पिच्छा सोडीना.

याचा परिणाम व्हायचा तोच झाला. कीर्तनाला येणाऱ्या श्रोत्यांना हें सहन होणें शक्य नव्हतें. ‘ माणसां ’ची जागा अडवून एका पशूनें कीर्तनश्रवणाची तंद्री साधावी, हें त्या सर्वांना कसेंसेंच वाटूं लागलें. त्यांनीं त्या वासराला मारहाण करून बाहेर काढलें. ही घटना जयरामस्वामींना रुचली नाहीं. त्यांनीं बहिणाबाईला आणि तिच्या लाडक्या वासराला जवळ आणलें. वात्सल्यानें त्यांना कुरवाळलें. परंतु हें बहिणाबाईचें वासराविषयींचें आणि जयरामस्वामींचें बहिणाबाईविषयींचें वात्सल्य अनेक ‘ परमार्थप्रवण ’ श्रोत्यांना आक्षेपार्ह वाटलें. त्यांपैकीं एका मीराबाई नामक स्त्रीनें रत्नाकर पाठकाचे कान भरविले. त्या दिवशीं बहिणाबाई घरीं येतांच रत्नाकर

पाठकानें त्या कोंवळ्या मुलीला निर्दयपणें मारलें आणि एका बंद खोलींत बांधून ठेवलें. बहिणाबाईची ही भयंकर अवस्था पाहून गोठ्यांतील गाय-वासरूं अस्वस्थ झालीं. त्यांनीं चारा-पाणी वर्ज्य केलें. ही पशूंची सहृदयता पाहून रत्नाकर पाठक वरमला आणि त्यानें पत्नीला मोकळें केलें.

आणिलें जंवळीं गाय वत्सापाशीं
हुंबरलीं जैसी पुत्र माता
आपण देखिलें वत्स आणि गाय
म्हणे प्राण जाय तरी बरा
बहिणी म्हणे तया तृणपाणी पाजी
न घेती ते माझी थोर माया

अशा या विकल मनःस्थितींत त्या बहिणावेड्या वासरानें अश्रूंच्या सरी वाहवीत देह ठेवला आणि त्या दुःखभरानें बहिणाबाई बेशुद्ध पडली. चार दिवसांनीं ती शुद्धीवर आली. शुद्धीवर येतांच समोर दिसलें तें नित्याचेंच जग. माता, पिता, पति, उपऱ्या घराच्या भिंती, वासरावेगळीं गाय, तिच्या गळ्यांतील दावें. पाहतां पाहतां तिची दृष्टि आंतल्या आंत मुरली. तिथें एक वेगळेंच जग धुमारूं लागलें. नसांतून वाहणाऱ्या लाल रक्ताची क्षणांत स्रोतस्विनी इंद्रायणी बनली. रोमारोमांतून तरु-वेली फुला-फळांनीं डंवरल्या, इंद्रायणीच्या अमृतस्पर्शानें धुंदावलेला वारा श्वसनांतून भिरभिरूं लागला आणि हृदयाच्या राउळांतून स्पंदनाबरोबर टाळांचा ध्वनि घुमूं लागला. त्यामागोमाग तुकोबांचें अनिवार्य आवाहनहि घुमूं लागलें——

संकोचोनि काय झालीस लहान ?
घेई आपोशण ब्रह्माण्डाचें !

त्या आवाहनाचा वेध घेत तिनें आपल्याच हृदयाच्या गाभाऱ्यांत डोकावलें, तों तिला दिसून आलें—

जयाचिया पदें होतसे विश्रांति
तेचि देहाकृति विठलाची
विठलासी तया नाहीं भेदभाव
ऐसें माझें मन साक्ष आहे !
पांडुरंग तुका पांडुरंग तुका
वेगळीक देखा होय केवीं
कलियुगीं बौद्धरूप धरी हरी
तुकोबाशरीरी प्रवेशला !

० ० ०

पण कोण हा तुकोबा ? " माणसांतून उठलेला एक शूद्र ! " स्वप्नांतील दर्शनाचा वृत्तान्त प्रकट झाल्याबरोबर तुकोबाची ओळख पतीनें अशी करून दिली. बहिणाबाईच्या अलौकिकत्वाच्या जाणिवेमुळें तिचा वाढूं लागलेला ' लौकिक ' आणि तिच्या अंतरांत उफाळलेली ' शूद्र ' तुकयाबद्दलची ओढ यांमुळें रत्नाकर पाठक भडकून उठला. त्याच्या पुरुषी अहंकाराला आणि पतित्वाला हें जणुं आव्हान होतें. त्याला बहिणाबाईच्या वर्तनांत ' मानसिक व्यभिचारा ' चा भास होऊं लागला.

कैंचा शूद्र तुका स्वप्नींचे दर्शनीं ?
बिघडली पत्नी काय करूं ?
कैंचा जयराम ? कैंचा पांडुरंग ?
माझा झाला भंग आश्रमाचा !
पाषाण विठल, स्वप्नांतील तुका !
प्रत्यक्ष कां सुखा अंतरावें ?

पतीचा प्रश्न हा असा रोख-ठोक होता. पत्नीच्या वर्तनाची याहून वेगळी संगति त्याच्या अनुभवकक्षेंत बसूंच शकत नव्हती. बहिणाबाईच्या हृदयांत एक विचित्र संघर्ष सुरू झाला. सतराव्या शतकांतील ती एक

ब्राह्मण स्त्री. वय लहान. आई-वडील-पति यांसह परागंदा जीवन नशिबीं आलेलें आणि रूढ 'पातिव्रत्या' ला बाधा आणणाऱ्या लौकिकावेगळ्या मनाच्या ओढी. आपलें वर्तन सहन न करण्यांत पतीची तरी काय चूक? प्रचलित नीतिकल्पना सांगतात : पति हाच स्त्रीचा गुरु, पति हेंच तिचें सर्वस्व. त्याच संस्कारांत तिचें मन घडलेलें आणि तरीहि तें मन तडजोडीला तयार होईना; आंतली ओढ आंतच जिरवण्यास राजी होईना. पातिव्रत्याचें अपरिहार्य व्रत आणि स्वप्नदृष्ट शूद्र गुरूची ओढ—यांतून काय निवडावें? प्रपंच-परमार्थाचें नातें अहिनकुलांसारखेंच आहे काय? प्रवृत्तिनिरासावांचून निवृत्तीचा उदय होणार नाहीं काय? पतिविषयक अनुरक्ति हृदयांतून निरस्त केल्याशिवाय परमार्थप्रवण विरक्ति संभवनीय नाहीं काय?— अशा 'शेषप्रश्नां'च्या सहस्र जिव्हा तिला दंश करूं लागल्या.

० ० ०

मी ब्राह्मण आणि तुकोबा शूद्र, याचा अर्थ काय? जीव, देह, वर्ण, याति, बुद्धिवैभव, कर्म यांतील कोणत्या कसोटीमुळें ब्राह्मणत्व वा शूद्रत्व प्राप्त होतें? वास्तविक—

सर्वांठायीं जीव सारिखाचि एक
पशुपक्षी देख चांडाळादि
देह हे सर्वांचे एकचि जाणिजे
पंचभूतें सहजें सर्वांठायीं
श्वेत तो ब्राह्मण क्षत्रिय आरक्त
वैश्य वर्ण पीत नाहीं ऐसें
कृष्ण वर्ण शूद्र नाहीं ऐसा भेद
आयुष्याचा बांध सारिखाचि
कैवर्तकीपोटीं व्यास तो जन्मला
विश्वामित्र जाला क्षत्रिणीचा

म्हणों जरी आतां ब्राह्मण पंडितां
न माने तत्त्वतां मना तेंहि
क्षत्रिय वैश्य शूद्र ब्राह्मणादि सर्व
पांडित्य अपूर्व करिती सर्व
आतां म्हणों जरी कर्म तें ब्राह्मण
चहूं वर्णीं जाण कर्म आहे

हें ' विवेकवैभव ' सतराव्या शतकांतील एका स्त्रीनें निर्माण केलें आहे. तिच्या जीवनांतील एका दारुण आंतरिक संघर्षांतून हें ' विवेक-वैभवा 'चें नवनीत उसळलें आहे. परंतु ब्राह्मण-शूद्रतेच्या रूढ कसोट्या विवेकशून्य असल्याची मनोमय ग्वाही तिच्या विवेकनिष्ठेनें देऊनहि समस्या सुटली नाहीं, तर ती अधिक तीव्र झाली. तुकोबांचें गुरुत्व, ते शूद्र आहेत म्हणून पत्करूं नये, या निषेधांत अर्थ नाहीं, इतकेंच त्यांतून निष्पन्न झालें. ' प्रपंच पत्करलेल्या एका स्त्रीनें परमार्थाच्या ओढीला विरोध करण्याऱ्या पतीचा त्याग करून स्वेच्छा-साधना आचरावी काय ? ' असा मूलभूत प्रश्न शिल्लकच राहिला. पतीच्या तिच्याकडून असलेल्या अपेक्षा अव्यवहार्य तर मुळींच नव्हत्या. बहिणाबाईनें भावबळानें पतीला जिंकायचा-साधनानुकूल बनवायचा निश्चय केला. आपल्या विवेकनिष्ठेशीं प्रतारणा न करतां साधना सुगम कशी करतां येईल, याचा तिला शोध लागला. सर्व जगाविषयीं प्रेमभावना बाणवूं पाहणाऱ्या परमार्थ-साधनेला पतिविरोध विसंगत ठरेल, असें तिला प्रामाणिकपणें वाटलें. घर सोडून जाऊं पाहणाऱ्या व मनस्तापानें आजारी पडलेल्या पतीची तिनें रात्रंदिवस सेवा केली आणि अखेर तिच्या भावबळाचा अपेक्षित विजय झाला.

नंतर ' साधना-पथावरील सहप्रवासी ' म्हणून तीं दोघें देहूला आलीं. तुकोबांच्या दर्शनाची चिरसंचित इच्छा तृप्त झाली. राउळांतील आनंद-ओवरींत तीन दिवस अखंड ध्यान केल्यावर अंतरींची दृढता अधिक

बलिष्ठ बनली आणि मग मंबाजीसारख्यांच्या विरोधांनींहि ती शबलित झाली नाहीं. या बलिष्ठ दृढतेमुळेंच—

बहिणी म्हणे तुझ्या बापाचें गांठोडें
वेचें का रोकडें भेटी देतां ?

असा परमात्म्यास जाब विचारण्याचें मनोधैर्य तिला प्राप्त झालें. तिनें तुकोबांच्या अमृतवाणीचें अखंड पान केलें; 'अक्षरभुजांनीं आलिंगन देणाऱ्या निर्गुण-निराकारा'चीं अनन्त दर्शनें ज्ञानेश्वरीच्या ओवीओवींत अनुभवलीं आणि कृतार्थ वर्तमानाच्या अखंड-असीम सागरांत भूत-भविष्यांच्या सीमा विरवून टाकल्या.

सहा तपांचें प्रदीर्घ जीवन पांडुरंगाच्या विराट् रूपांत विलीन करतांना विवेक हाच या ब्रह्मरूपिणीचा पथप्रदर्शक होता—

विवेक सांगातीं जयासी जोडला
थारा तो मोडला पातकांचा।
तो आम्हीं विवेक केलासे कैवारी
मना, तुझी करी कोण चिंता ?
बहिणी म्हणे मना, विवेक हा खरा
तुझिया व्यापारा कोण पुसे ?

—'निजबोधाचा डमरू घुमविणारा विवेक-भैरव' तिच्या तना-मनांत नित्य संचार करीत राहिल्यामुळेंच ती अहंकारशून्य आत्मगौरवाचा उद्‌घोष करूं शकली :

प्रपंच परमार्थ चालवी समान,
तिनेंच गगन झेलियेलें !

'साधना', ४ जलै १९५९

# खलिल जिब्रान

खलिल जिब्रान ‘ प्रॉफेट ’चा निर्माता म्हणून सर्व जगाला परिचित आहे. तत्त्वज्ञ, कवि आणि चित्रकार म्हणून त्याची सर्वत्र ख्याति आहे. काव्य आणि चित्र या दोन्ही कलांची त्याला अभिजात देणगी होती. जुळ्या मुलांच्या पित्याप्रमाणें या दोन्ही कलांबद्दल त्याला सारखीच आवड होती. काव्य लिहायला आणि चित्र चितारायला आपल्याला खूप कागद मिळावेत, म्हणून वयाच्या चौथ्या वर्षींच त्यानें ‘ कागदाचें झाड ’ लावलें होतें ! अनन्त गीतांचें जीवन जगणाऱ्या मातेनें त्याचें काव्य-प्रेम फुलविलें आणि इटलीचा महान् कलाकार लिओनार्डो याच्या चित्रांनीं त्याला रंगरेखांचें वेड लावलें. जीवनाविषयींचें प्रगाढ चिन्तन त्यानें काव्य आणि चित्र या दोन्ही माध्यमांतून सारख्याच सामर्थ्यानें व्यक्त केलें आहे.

जिब्रानचें संपूर्ण जीवन कसल्या तरी अपार्थिव गूढतेनें भारलेलें होतें. तो या जगांत वावरत असूनहि निराळा होता. त्याच्या आत्म्याला जणूं भूतकालच नव्हता. आणि याचमुळें या जगांतील अणुरेणूकडे तो एका असीम कुतूहलानें पाहत असे. त्याच्या ‘ अर्थ् गॉड्स् ’ मधील एका देवते-प्रमाणें तो धरतीवरील प्रेमाच्या विलोभनानें अवतरलेला एक ‘ परस्थ ’ आत्मा होता. तो अनेकदां इथें असूनहि इथें नसे. त्याचें जग जणूं वेगळेंच होतें. परमश्रेयाच्या संशोधनासाठीं भटकत असतांना या जगांत नव्यानेंच

आलेला तो एक मुशाफीर होता. तो ' परस्थ ' होता, तरीहि या हिरव्या धरतीविषयीं त्याला अपार जिव्हाळा वाटे. ऋतुचक्रांतून बदलणारें निसर्गश्रीचें नित्यनूतन सौंदर्य, गहनगूढ आकाशांतील मनोहर रंगलाघव, कोंभांच्या लवलवींतून प्रकटणारें भूमीचें हिरवें मार्दव, दंवानें भिजलेल्या फुलांतील हंसरी कोंवळीक, स्निग्ध छायेंतील मूक प्रीति आणि मध्यरात्रींच्या गभीर तमिस्रेचें भावगर्भ मौन हे सर्व त्याच्या निर्माणशक्तीचे मूलस्रोत होते.

कोमलतेबरोबर रुद्रतेविषयींहि त्याला अमर्याद आकर्षण होतें. विजांचा लखलखाट, मेघांचा गडगडाट आणि वायूचें प्रलयंकर तांडव पाहिलें कीं त्याचा आत्मा समवेदनेनें बेहोष होई आणि तो रुद्राला मिठी मारण्यासाठीं धांवत सुटे. वर्षेचें हृदय धरतीवर सहस्रधारांनी ओसंडूं लागलें की जिब्रानहि त्या धारानृत्याला साथ देण्यासाठीं लहानपणीं उघडानागडा धांवत सुटे. प्रखर सूर्यबिंबाकडे एकटक पाहत राहून तो प्रकाशाचें प्राशन करीत असे. त्याच्या प्रकृतींतच मुळीं पहांटेच्या दंवांतील हळवेपणा आणि वर्षाकालीन बादळांतील भीषणता एकसाथ नांदत होती.

चैतन्यानें रसरसलेल्या लेबॅनॉनच्या डोंगरपठारांत त्याचें बालपण गेलें. येशूच्या सान्निध्यानें पावन झालेल्या देवदारवनांत त्यानें जीवनाचे पहिले-वहिले पाठ घेतले. आई कामिला रहमी आणि धर्मगुरु फादर यूसफ यांच्या सहवासांत त्यानें विशाल प्रेमभावनेची दीक्षा घेतली. द्राक्षांच्या मळ्यांत आणि हिरव्यागार कुरणांत संचार करून त्यानें निसर्गाच्या बदलत्या रंगरेखांचें सौंदर्य टिपून घेतलें. झोपडीपासून राजवाड्यापर्यंत त्याच्या मनानें संचार करून मानवाचीं दुःखें समजावून घेतलीं आणि प्रस्तराचें हृदय फोडून उफाळणाऱ्या निर्मळ झऱ्याप्रमाणें त्याची अनुभूति शब्दांतून आणि रेखांतून प्रकट होऊं लागली.

प्रेम हेंच त्याच्या कलेचें अधिष्ठान आहे. वंचित आणि व्यथित मानवतेविषयींची अपार सहानुभूति त्याच्या शब्दाशब्दांतून प्रकटली आहे.

मानव हाच त्याच्या चिंतनाचा विषय आहे. मानवाचीं सामर्थ्यें आणि दौर्बल्यें त्यानें पूर्णपणें निरखलीं आहेत. पापाची त्यानें कधींहि घृणा केली नाहीं. " या जगांत पापाचें अस्तित्व नाहीं. तें आपणच निर्माण करीत असतों. आणि त्यामुळें तें नष्ट करणेंहि आपल्याच हातीं आहे, " अशी त्याची श्रद्धा आहे. आणि म्हणूनच पतितांसाठीं स्वर्गाचें दार ठोठावयला तो सदैव तत्पर आहे.

भुकेल्या लेकरांसाठी भाकरी चोरणारा चोर, प्रेमाच्या हांकेला ' ओ ' देण्यासाठीं परद्वार रिघणारी व्यभिचारिणी, आपल्या कच्च्याबच्च्यांसाठीं नरहत्या करणारा खुनी, जीवनाचा उन्हाळा झाल्यामुळें मदिरेच्या प्याल्यांत सुख अनुभविणारा मद्यपी आणि रुपेरी चमचाचा सोनेरी सूर्य करूं इच्छिणारा कंगाल जुगारी हे सर्व जिब्रानच्या येशूचे सांगाती आहेत. त्यांना अपराधी बनविणाऱ्या दांभिकांबद्दल जिब्रानला अत्यंत चीड आहे. सौजन्याचे, सभ्यतेचे आणि पावित्र्याचे मुखवटे चढवून इतररांना नीति शिकविणारे आणि अनन्त जीवांचें शोषण करून त्यांचें जीवन घृणित बनविणारे उलट्या काळजाचे प्राणी पाहून जिब्रानचें हृदय खवळून उठे. आपल्या वयाच्या पंचविशीच्या आंतच जिब्राननें दांभिकांच्या पाशवी लीला जवळून पाहिल्या आहेत. त्या पाशवी लीलांत उद्ध्वस्त झालेलीं आणि पतनाच्या गर्तेत सडणारीं अनन्त जीवनें पाहून त्याचें हृदय विव्हळ झालें. त्या जीवनांच्या ' थडग्यांमधील आक्रोश ' जिब्राननें आपल्या वाणींत प्रतिध्वनित केला आणि तथाकथित सौजन्याचे बुरखे फाडून दांभिकांचीं पापें बैरूतच्या बाजारपेठेंत उघडीं केलीं !

० ० ०

आणि ही बंडखोरी जिब्राननें विशीच्या आंत केली. सन १९०३ च्या सुमारास पॅरिसला चित्रकलेचा अभ्यास करीत असतांना जिब्राननें आपलें ' बंडखोर आत्मे ' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकानें सीरियांतार-

जडतेला, रूढिग्रस्त समाजव्यवस्थेला सुरुंग लागला. विवाह, वित्त, दंड आणि धर्म या चारहि संस्थांच्या जीर्ण स्वरूपाचा धुव्वा उडविणारें हें पुस्तक प्रसिद्ध होतांच सीरियांतील पुरोहितशाहीनें बैरुतच्या बाजारपेठेंत त्याची होळी केली. "Dangerous, Revolutionary and Poisonous to youth." असें पुस्तक लिहिल्याबद्दल जिब्रानवर हद्दपारीची पाळी आली आणि मॅरोनाइट चर्चमधून त्याला बहिष्कृत केलें. मारुतीच्या विनाशासाठीं रावणानें पेटविलेल्या शेपटीनें जशी लंकेची राखरांगोळी केली, तीच अवस्था रूढिदासांच्या कपाळीं आली !

'बंडखोर आत्मे' या पुस्तकांत जिब्रानचा सर्वांगीण क्रांतिवाद परिस्फुटित झाला आहे. श्रद्धा, प्रेम आणि कर्म या तत्त्वत्रयीच्या अधिष्ठानावर मानवतेचें महन्मंगल मंदिर उभारतां येईल, असा जिब्रानचा विश्वास आहे. या पुस्तकांतील चारहि कथांत याच तत्त्वत्रयीचा उद्घोष करण्यांत आला आहे. प्रेमावर विवाह आणि श्रमावर वित्त उभारण्याच्या कामीं मानवजात यशस्वी झाली, तर दंड आणि धर्म या संस्थांचें प्रयोजन उरणार नाहीं, अशी जिब्रानची विचारसरणी आहे. 'थडग्यांचा आक्रोश' या कथेंत त्यानें अपराध आणि शासन यांविषयींचा दृष्टिकोन मांडला आहे. या कथेचें विचारसूत्र आपणांस 'प्रॉफेट' मधील 'अपराध आणि शासन' या प्रवचनांत आढळेल : "हे न्यायी होऊं इच्छिणाऱ्या न्यायाधीशांनो, तुम्ही त्याला कोणती शिक्षा कराल, की जो देहानें प्रामाणिक असून मनानें मात्र चोर आहे ? तुम्ही त्याला काय दंड कराल, कीं जो शरीरानें वध करणारा आहे, पण ज्याच्या स्वतःच्याच आत्म्याचा वध झाला आहे ? आणि त्याच्यावरील खटला तुम्ही कसा चालवाल, कीं जो आचरणांत ठकविणारा व जुलूम करणारा आहे, पण जो स्वतःच दुःख आणि जुलूम यांनीं संत्रस्त झालेला आहे ?" आत्म्याला जीर्ण रूढिबंधनांत जखडणाऱ्या धर्मसंस्थेवर जिब्राननें निष्ठुर हल्ला चढविला आहे. बंडखोर आत्म्यांतील

शेवटच्या कथेचा नायक काफीर खलिल जेव्हां दंड आणि धर्म या संस्थांच्या प्रचंड पाशवी विरोधापुढें असीम आत्मनिष्ठेनें सत्यरक्षणासाठीं झुंजायला उभा राहतो, तेव्हां जणुं जिब्रानचाच 'काफीर' आत्मा मृत्युंजयी सामर्थ्यानें सत्याचा पुरस्कार करीत आहे असें वाटतें.

० ० ०

'मॅडमन' हें इंग्रजींत प्रसिद्ध होणारें जिब्रानचें पहिलें पुस्तक. सन १९१८ मध्यें आल्फ्रेड ए. नॉफ् या हौशी आणि रसिक प्रकाशकानें हें प्रसिद्ध केलें. या पुस्तकांतील कांहीं भाग त्यानें स्वतःच्या अरबी ध्वनिकथांवरून अनुवादलेला आणि कांहीं भाग नव्यानेंच इंग्रजींत लिहिलेला आहे. या सत्तर पानी छोट्या पुस्तकांत जिब्रानच्या कोंवळ्या प्रतिभेचा आविष्कार आहे. त्याच्या भावमय आन्तर-जीवनाचें हें प्रभावी प्रकटीकरण आहे. अर्थात् 'फोररनर' मध्यें पालवणाऱ्या आणि 'प्रॉफेट'मध्यें मोहोरणाऱ्या विशाल प्रज्ञेचा आणि अपार सहानुभूतीचा संयत विलास यांत त्या प्रमाणांत आढळत नाहीं. 'मॅडमन'मध्यें जिब्राननें जीवनांतील विकृतींवर उपरोधाचें तीक्ष्ण हत्यार चालविलें आहे. 'मॅडमन' मधील ध्वनिकथांविषयीं बार्बरा यंगनें लिहिलें आहे :

"These parables show him in rebellion against hypocrisy and blindness and stupidity."

या पुस्तकांतील शेवटच्या ओळींवरून पुस्तकाची भूमिका आणि जिब्रानच्या कलात्मक उपरोधाचें स्वरूप स्पष्ट होईल :

"हे नष्टात्म्यांच्या प्रभो, माझी विनवणी ऐक. पूर्णतेस पोंचलेल्या मानववंशांत मी अत्यंत अपूर्ण प्राणी राहत आहें.

"मी एक आदिमानव, संमिश्र तत्त्वांचा गोळा—

"या सुविकसित जगतांत, या सुसंबद्ध आणि विशुद्ध विधिनियमांच्या लोकांत वावरत आहें.

" ओठांवर हंसूं खेळवीत शेजाऱ्याला लुबाडणें, दूरदर्शीपणें वाखाणणें, धूर्तपणानें दूषविणें, शब्दानें आत्म्याची हत्या करणें, श्वासानें शरीर जाळणें आणि दिवसभराचा हा कार्यक्रम उरकला कीं हात धुऊन मोकळें होणें....

" हे नष्टात्म्यांच्या प्रभो, कशाला मी इथें आहें ?"

उपरोधाबरोबरच ' मॅडमन 'मध्यें ' कालातीत स्मृतीं 'चा उदात्त आविष्कारहि आहे—

" आणि सहस्र वर्षांनंतर मी त्या पवित्र पर्वतावर चढून गेलों आणि प्रभूला म्हणालों : हे माझ्या प्रभो, माझ्या ध्येया आणि माझ्या पूर्णते ! मी तुझा भूत आहें आणि तूं माझा भविष्य आहेस. मी तुझें भूमींतील मूळ आहे आणि तूं माझें आकाशांतील फूल आहेस, आणि रविमुखासमोर आपण दोघेहि एकसाथ वाढत आहोंत."

प्रसिद्धीनंतर लौकरच ' मॅडमन 'चीं फ्रेंच, जर्मन, इटालियन आणि स्पॅनिश भाषांत भाषांतरें झालीं. या पुस्तकानें जिब्रानला अनेक मित्र मिळवून दिले.

' मॅडमन 'च्या पाठोपाठ सन १९२० मध्यें ' फोररनर ' प्रसिद्ध झालें. हें पुस्तकहि अंशतः अरबीवरून अनुवादलेलें आहे. या पुस्तकांत दृष्टीची व्यापकता, प्रज्ञेची खोली आणि कणवेची कोंवळिक ' मॅडमन 'हून अधिक प्रमाणांत आहे. यांतील ध्वनिकथांना संयत उपरोधाचा स्पर्श आहे. यांत अज्ञाताचा वेध घेण्याचें वेड आहे. प्रेम आणि उत्कंठा यांचा उद्रेक आहे. या पुस्तकांतील ' लव्ह ', ' सेड ए शीट ऑफ स्नो—व्हाइट पेपर ', ' दि स्कॉलर ॲण्ड दि पोएट ', ' आउट ऑफ माय डीपर हार्ट ', ' गॉड्स् फूल ' आणि ' लास्ट वॉच ' या ध्वनिकथांनीं अनेक वाचकांना वेड लावलें आहे.

तत्त्वप्रतिपादनासाठीं ध्वनिकथेचें माध्यम पूर्वेकडे प्राचीन काळापासून वापरलें गेलें आहे. परन्तु या माध्यमाचा उपयोग जिब्राननें अत्यन्त कौशल्यानें आणि सामर्थ्यानें केला आहे. मोजक्या शब्दांत सत्याचें सहजसूचन करण्याची कला त्याच्या कथांत कळसास पोंचली आहे. ध्वनिकथेच्या बाबतींत जिब्रानचा हात धरणारा लेखक आज विश्वसाहित्यांत आढळणार नाहीं.

० ० ०

" रात्र संपली आहे. उदयगिरीवर उषा दुडदुडत येत आहे. आपण रात्रीच्या लेकरांनीं आतां नष्ट झालेंच पाहिजे. आपल्या रक्षेंतून एका प्रभावी प्रेमाचा उदय होईल आणि तें मृत्युंजयी प्रेम सूर्याच्या प्रकाशांत हंसेल. "

'फोररनर' मधील या अखेरच्या आश्वासनानंतर, सूर्यप्रकाशांत हंसणाऱ्या त्या प्रभावी प्रेमाची साक्ष देण्यासाठीं तीनच वर्षांनीं 'प्रॉफेट' प्रसिद्ध झालें. वास्तविक हें पुस्तक बैरूतच्या 'ज्ञानशाळे'त शिकत असतांना वयाच्या पंधराव्या वर्षींच जिब्राननें लिहिलें होतें. परंतु आईच्या सल्ल्यावरून त्यानें या ग्रंथाच्या प्रकाशनाची घाई न करतां त्याचीं अनेक संस्करणें केलीं. प्रेम, प्रज्ञा आणि प्रतिभा यांच्या त्रिवेणी संगमांतून उमललेलें हें 'जीवन-दर्शन' व्यापक अनुभूतीच्या निकषावर त्यानें परिशुद्ध केलें आणि मानवतेच्या चिरंतन कल्याणाचा मार्ग उजळून टाकला. या पुस्तकांत माणसानें माणसाशीं कसें वागावें, हें जिब्राननें सांगितलें आहे. प्रेम, विवाह, बालकें, श्रम, क्रय-विक्रय, अपराध व शासन, कायदे, विवेक व वासना, सुखदुःख, सौंदर्य, धर्म, मृत्यु इत्यादि जीवनाच्या सर्व अंगोपांगांचा मूलगामी विचार या पुस्तकांत केला आहे. महाप्रयाणाला निघालेला एक महामानव—अल् मुस्तफा—सर्वांचा निरोप घेत आहे आणि अन्तरींच्या उमाळ्यांतून मानवतेशीं अखेरचें हितगूज करीत आहे, अशी या पुस्तकाची भूमिका आहे. या पुस्तकानें सर्व जगाचें लक्ष वेधून घेतलें आणि अनेक संत्रस्त आत्म्यांना जीवनाचें सत्यदर्शन घडविलें. 'प्रॉफेट' ला 'जीवन-संहिता' (Code

of Life) मानून पूर्णतेची वाटचाल करणारे अनेक 'मुमुक्षु' आज जगांत आहेत. उद्यांच्या निर्दोष समाजरचनेचा आदर्श निर्माण करणारा 'आध्यामिक समाजवाद' प्रॉफेटनें पुरस्कारिला आहे.......

"पृथ्वीच्या देणग्यांचा परस्परांत विनिमय करून तुम्हांला समृद्धि आणि संतोष मिळेल.

"तथापि, तुमचा हा विनिमय प्रेम आणि उदार न्यायबुद्धि यांनीं युक्त नसेल, तर तो कांहीं जणांचा लोभ आणि इतरांची उपासमारच वाढवील.

"जे केवळ रिकाम्या हातांनीं येत असतील व तुमच्या श्रमाचा मोबदला म्हणून केवळ आपले शब्दच विकूं इच्छितील, त्यांना आपल्या-बरोबर व्यवहार करूं देऊं नका....

"आणि तेथें गाणारे, नाचणारे आणि बांसरी वाजविणारे आले तर त्यांचे गुणहि खरेदी करा.

"कारण....त्यांनीं आणिलेलें कल्पनानिर्मित असलें तरी तें तुमच्या आत्म्याचें अन्न आणि वस्त्र आहे.

"आणि बाजारांतून परतण्यापूर्वीं कोणीहि रिकाम्या हातानें परत गेला नाहीं, अशी खात्री करून घ्या.

"कारण, तुमच्यामधील क्षुद्रांतल्या क्षुद्र जीवाच्याहि गरजा पूर्ण झाल्या नाहींत तोंपर्यंत पृथ्वीचा श्रेष्ठ अन्तरात्मा वायुलहरींवर शांततेनें झोंपूं शकणार नाहीं."

'प्रॉफेट'मधील तत्त्वज्ञानाच्या पूर्ततेसाठीं आणखी दोन ग्रंथ लिहिण्याचा जिब्रानचा संकल्प होता. पैकीं 'गार्डन ऑफ् दि प्रॉफेट' (पैगंबराचा बगीचा) या ग्रंथाचे सुटे भाग लिहून झाल्यावर लवकरच जिब्रानचा अन्त झाला आणि त्यामुळें जिब्रानच्या या प्रस्थानत्रयींतील 'डेथ ऑफ् दि प्रॉफेट' (पैगंबराचें महाप्रयाण) या ग्रंथाला आपण कायमचें मुकलों. या तिसऱ्या संकल्पित ग्रंथांत मानव आणि परमेश्वर यांच्या संबंधांवर प्रकाश

टाकण्याचा जिब्रानचा मानस होता. या प्रॉफेट-त्रयीची निर्मिति म्हणजे जिब्रानच्या आत्मविकसनाचा इतिहास आहे. आत्म्याचें अविनाशित्व आणि जीवनाचें सातत्य ( Continuity of Life ) यांवर जिब्रानची श्रद्धा असल्यामुळें त्यानें या ग्रंथांतून मृत्यूचें महाकाव्य निर्माण केलें आहे. "दुसऱ्या जगांतील पहांटेच्या वेळीं जागें होण्यासाठीं आपण संध्येंतून प्रवास करूं," असें तो म्हणतो.

० ० ०

या ग्रंथाचे सुटे भाग जिब्रानकडून लिहून झाले होते. त्या सर्व भागांना एका सूत्रांत गुंफण्याचें काम त्याच्या समानशील मैत्रिणीनें-बार्बरा यंगनें केलें. या ग्रंथांत प्रथम 'प्रॉफेट' ऑर्फालीझला परतल्याचें वर्णन आहे. नंतर तो एकटाच आपल्या आईच्या बगीच्यांत बसून चिंतनमग्न होतो. त्याच्याजवळ करीमा नांवाच्या बालमैत्रिणीशिवाय अन्य कोणीहि नसतें. शेवटीं आपल्या मित्रांना प्रवेश देण्यासाठीं तो दार उघडतो. तेथें त्याचे पूर्वींचे नऊ सोबती शिष्य म्हणून येतात. त्यांना तो मानव व निसर्ग यांतील संबंधांचें रहस्य क्रमाक्रमानें समजावून सांगतो. परंतु त्या शिष्यांची लौकिक व्यवहाराची आसक्ति प्रबळ झाल्यानें त्यांना तें रुचत नाहीं, कळत नाहीं. ते सर्व आपल्या गुरुदेवाला सोडून निघून जातात. पैगंबराला मात्र त्यामुळें वाईट वाटतें. आपलें ज्ञानभांडार त्यांनीं लुटावें, आपल्याजवळील मधु त्यांनीं लुटावा, आपला फलभार त्यांनीं स्वीकारावा, अशी त्याची मनीषा! एकटी करीमा फक्त त्याच्याजवळ राहते. पैगंबर हा महामानव आहे. आणि करीमा ही कोमलतेच्या रसायनांत साकारलेली मानवी श्रद्धेची मूर्ति आहे. महामानवांच्या साक्षात्काराची, सत्य-दर्शनाची भागीदारी करावयाची असेल, तर परिशुद्ध श्रद्धा हवी. विकल्पाच्या डोळ्यांनीं त्याचें जीवनरहस्य उमगायचें नाहीं. करीमा ही जिब्रानची अमर निर्मिति आहे.

या ग्रंथांत मानव आणि निसर्ग, जड आणि चेतनसृष्टि यांतील अद्वैत दाखविलें आहे. हें जड-चेतनाच्या अनुबंधाचें तत्त्वज्ञान उत्स्फूर्त

आहे—साक्षात्काराचें आहे. आणि त्याचमुळें या ग्रंथाचें स्वरूप दक्ष तत्त्व चर्चेचें न राहतां निगूढ अनुभूतीनें युक्त अशा भावगीतासारखें बनलें आहे. 'पैगंबराच्या बगीच्यां'त जिब्रानच्या सौंदर्य-दर्शनाची चरमसीमा आहे. "Create beauty and let all other things go to hell" हें जिब्रानच्या जीवनसाधनेचें प्रधान सूत्र होतें. सौंदर्यदृष्टीनें परमतत्त्वाचें दर्शन घेणाऱ्या जिब्रानचा 'सौंदर्य' हा धर्म बनला होता. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत जर सौंदर्य-दृष्टीचें अधिराज्य नांदेल तर न्यायाची पुनश्च प्रतिष्ठापना व्हायला वेळ लागणार नाहीं. जिब्राननें याच श्रद्धेनें आपली कलासृष्टि उभारली. 'प्रॉफेट' आणि 'गार्डन ऑफ दि प्रॉफेट' या दोन ग्रंथांत जिब्रानच्या चैतन्याची आत्मकथा आहे. या दोन ग्रंथांचा नायक अल् मुस्तफा म्हणजे जिब्रानच्या आंतरिक जीवनाचा वाङ्मयीन आविष्कार आहे. अल् मुस्तफाच्या मुखानें जिब्राननें आपल्या जीवन-दर्शनांतील सौंदर्य-दृष्टीचें महिम्नस्तोत्र गायिलें आहे.

• • •

'जीझस : दि सन् ऑफ मॅन' हा ग्रंथहि जिब्राननें स्फूर्तीच्या उमाळ्यांत लिहिला आहे. 'मानवतेचा मित्र आणि बंधु' जो येशू त्याच्याविषयीं आपण कांहीं तरी लिहावें, त्याच्या जीवनाचें रहस्य आपण उकलून दाखवावें, त्याचा प्रेमधर्माचा सन्देश आपण पुन्हां सर्वत्र घुमवावा, अशी जिब्रानला फार दिवसांची ओढ होती. वाऱ्यावर वावरणाऱ्या वासराप्रमाणें त्याचें मन वर्तमानाचे दोर तोडून अतीतकालाच्या गाभाऱ्यांत घुसत असें, त्या देवदारवनांत, त्या पवित्र पर्वतांच्या परिसरांत, त्या हिरव्या धरतीवर प्रभूचा प्रत्येक पदक्षेप जणुं जिब्रान आपल्या आंतल्या डोळ्यांनीं पाहत होता. तासन् तास तो दोन हजार वर्षांपूर्वीच्या 'पवित्र भूमी'त वावरत असे. आणि अखेर त्याला प्रभूचें दर्शन झालें. एकदां.... दोनदां...तीनदां...वादळाहून सामर्थ्यशाली अशी मूर्ति....तरुशाखांप्रमाणें

मजबूत हात....उन्नत माथा....आणि चेहऱ्यावर विशाल हेतु आणि मूक उत्कंठा.

जिब्राननें येशूचें जीवन रेखायला प्रारंभ केला. अगदीं अभिनव पद्धतीनें—अभिनव शब्दांत ! येशूच्या काळांतील व्यक्तींना—सुष्टांना आणि दुष्टांना—येशू जसा दिसला, तसा या ग्रंथांत चित्रित केला आहे. या ग्रंथाला पश्चिमी जगांत 'बायबल' इतका मान दिला जातो. 'गॉस्पेल ॲकॉर्डिंग टु जिब्रान' या शब्दांनीं त्याचें वर्णन केलें जातें. या ग्रंथामुळें जिब्रानला 'विसाव्या शतकांतील जीझस ख्राइस्ट' इतकें माहात्म्य प्राप्त झालें आहे.

याशिवाय, प्रवासमार्गावरील धूलि आणि तितिक्षा यांनीं भारलेला 'प्रवासी', प्रेम हेंच विवाहाचें अधिष्ठान व्हावें, यासाठीं बलिदान करणाऱ्या एका तरुणीची दर्दभरी कहाणी सांगणारे 'तुटलेले पंख', जीवनांतील अनेकविध सत्यांचें दर्शन घडणाऱ्या सुभाषितांचा संग्रह 'वाळू आणि फेस', अरबी स्फुट रचनांवरून अनुवादलेलीं 'हृदयाचीं रहस्यें', तसेंच 'भूदेवता', 'गिरिबाला,' 'गद्यकविता' असे आणखीहि जिब्रानचे ग्रंथ आहेत.

० ० ०

जिब्रानच्या मतें 'कला हें वास्तवाचें चिरन्तनाकडे पडणारें पाऊल आहे.' जिब्रानच्या रंगरेखांतहि हाच चिरंतनाचा ध्यास आहे. त्याच्या चित्रांत चिरंतनत्व पावलेल्या विभूतींचीं अनेक चित्रें आहेत. वयाच्या अठराव्या वर्षींच त्यानें आपल्या कल्पनेंतून अरबी संस्कृतीच्या शिल्पकारांचीं, मुसलमानपूर्व अरबी कवींचीं आणि तत्त्वज्ञांचीं चित्रें चितारलीं. पॅरिसला रोडिनच्या कलाशाळेंत आपली चित्रसाधना पुरी केल्यावर रंगरेखांच्या माध्यमांतून आपल्या गूढ अनुभूति साकार करण्यास त्यानें प्रारंभ केला. सन १९०३ ते १९०८ या काळांत त्याच्या चित्रांचीं तीन प्रदर्शनें भरलीं आणि आपल्या गूढरम्य कलेनें त्यानें सर्वांना मंत्रमुग्ध केलें. त्याच्या अनेक पुस्तकांतून त्याचीं प्रतीकात्मक चित्रें समाविष्ट आहेत. सन १९१९ मध्यें 'ट्वेन्टी ड्रॉइंग्ज' (वीस चित्रें) हा केवळ चित्रांचा संग्रह प्रसिद्ध झाला.

जिब्रानचें हें चित्रविश्व जिवन्त आहे. प्रभूच्या निर्मितीचें विशुद्ध मूळ स्वरूप त्यांत आविष्कृत झालें आहे. तें ‘ अनावृत ’ आहे, तरीहि सुंदर आहे, शिव आहे.

जिब्राननें पुराणांतील देवदेवता वा दैत्यदानव आपल्या चित्रविषया-साठीं कधींच वापरले नाहींत. पूर्णतेच्या स्वप्नांत साकारलेले महामानवच त्याच्या चित्रांचे विषय आहेत.

“ Gibran painted man, the divine man, as a thing of sensitive beauty, flesh that is not fleshy, body that is disembodied of earthliness, spirit thinly veiled. ”

जिब्रानच्या कलेंत निसर्ग आणि मानव यांच्या एकात्मतेची जाणीव सर्वत्र दृग्गोचर होते. त्याला सर्व चराचरांत एकाच अमर्याद प्रेमतत्त्वाचा साक्षात्कार झाला आहे आणि हाच साक्षात्कार त्यानें विविध रंगरेखांतून सहजतया व्यक्त केला आहे. गूढतरल अनुभूतींचा सुगंध शब्दांच्या वा रेखांच्या कुपींत सांठविण्याचें कौशल्य जिब्रानला साधलें असल्यामुळें सजीवता हा त्याच्या कलेचा फार मोठा विशेष बनला आहे. त्याचीं अनेक चित्रें पाहतांना आपणांस अविरत चाललेलें श्वसन, पापणीची उघडझांप, ओठांची थरथर, हृदयाचें स्पंदन आणि वाऱ्यानें होणारी वस्त्रांची हाल-चाल स्पष्ट जाणवते. आणि त्याचमुळें त्याच्या चित्रशाळेंतून परततांना आपण सजीव व्यक्तींच्या सहवासांतील स्मृति घेऊन परततों.

जिब्रान हा रंग-रेखांचा प्रभु आहे. आपल्या कलेविषयीं त्याला संपूर्ण आत्मविश्वास होता. एकदां नाममुद्रांकन नसलेल्या चित्रांवर एका मित्रानें त्याला सह्या करण्यास सुचविलें. तेव्हां तो हंसून म्हणाला : “ छे ! सह्यांची काय आवश्यकता आहे ? त्या देवदारवनांत धरतीच्या कुशींत मी कायमचा झोंपीं गेल्यावरहि हीं चित्रें जिब्रानचीं म्हणूनच ओळखलीं जातील ! ”

० ० ०

जिब्रानची निर्माणशक्ति उर्वशीप्रमाणें चिरयौवना होती. वयाच्या चौथ्या वर्षापासून जीवनाच्या अखेरच्या क्षणापर्यंत सौंदर्याचे आणि सत्तत्त्वाचे नवनवीन उन्मेष त्याच्या प्रतिभेंतून फुटले आहेत. त्याची संपूर्ण जीवनयात्रा ही सौन्दर्यसाक्षात्काराची अखंड प्रक्रिया होती. जीवनाच्या अन्तिम सत्याचा वेध घेणारी सर्वस्पर्शी प्रज्ञा आणि अनुभूतीच्या भुजांनीं चिदाकाशाला मिठी मारणारी प्रमत्त प्रतिभा यांमुळें त्याचें साहित्य अमर झालें आहे. जिब्रान आनन्दयात्री आहे. प्रेमाचें पाथेय बरोबर घेऊन आणि सौन्दर्यदृष्टि जागी ठेवून तो अखंड चिरंतनाची वाटचाल करीत आहे.

'साधना', ७ जानेवारी १९५६

श्री. रा. चिं. ढेरे यांची

# वाङ्मयसंपदा

## संशोधनात्मक ग्रंथ

१. श्रीनरसिंह सरस्वती : चरित्र आणि परंपरा
( दत्त संप्रदायाचा इतिहास )

२. श्रीगुरु गोरक्षनाथ : चरित्र आणि परंपरा
( नाथ संप्रदायाचा इतिहास )

३. खंडोबा ( देवतावैज्ञानिक अध्ययन )

## चरित्रात्मक पुस्तकें

४. श्रीशारदामाता ( श्रीरामकृष्ण परमहंसांच्या पत्नींचें चरित्र )

५. नामयाची जनी ( जनाबाई : जीवन, साधना आणि कविता )

६. भक्तिवेडी बहिणा ( संत बहिणाबाई )

७. प्रवासी पंडित ( ह्यूएन्त्संग–चिनी प्रवासी )

८. नृपनिर्माता ( आर्य चाणक्य )

९. तेजस्वी धर्मोध्दारक ( श्रीशंकराचार्य )

१०. महावीर चक्रधर (महानुभावपंथ–संस्थापक चक्रधर)

## ललित निबंध

११. अमृतकन्या (विदग्धसंस्कृत साहित्यांतील स्त्रीपात्रांचा चरित्रास्वाद)

१२. इंद्रायणी (संत-साहित्यिकांचा गौरव गाणारे नऊ लेख)

**क्षेत्रवर्णनात्मक पुस्तिका**

१३–२७. देहू, आळंदी, चिंचवड, पैठण, नाशिक–त्र्यंबकेश्वर, नरसोबाची वाडी–औदुंबर, गाणगापूर, परशुराम–क्षेत्र, वेरूळ, माहूर, आंबेजोगाई, औंढ्या नागनाथ, उज्जयिनी, जगन्नाथपुरी, भुवनेश्वर तीर्थक्षेत्रांचा सांस्कृतिक इतिहास देणाऱ्या पंधरा पुस्तिका.

**संपादित ग्रंथ**

२८–३२. हरिवदा, खंड ४ ते ८

३३. आज्ञापत्र ( प्रा. प्र. पं. जोशी यांच्या सहकार्याने )

